# संगीत संन्यस्त खड्ग



सावरकर भवन, राजा ठाकूर पथ, शनिवार पेठ, पुणे.

दूरध्वनी :+९१२०२५५४४७५१



## प्रकल्प संचालक : रणजित विक्रम सावरकर

प्रकल्प समन्वयक : अशोक रामचंद्र शिंदे

हे पुस्तक आसामी, बंगाली, इंग्रजी, गुजराथी, हिंदी, कन्नड, मल्याळम, मराठी, ओडिया, पंजाबी, तमिळ, तेलुगु या भाषांमध्ये उपलब्ध आहे.

# संगीत संन्यस्त खड्ग

अंक पहिला

प्रवेश १ ला

(तपोवनातील देवीचे देऊळ. नाचाच्या मुली गाणे गातात.)

राग- यमन. ताल- एकताल. चाल- (हाला। मधुमती विलसित-)

किती तरि सुललित सहज- गीति- । तार न बहु ताणी ।। ध्रु. ।।

ताणिशि तनु-बीन तुटे शिथिल तरी गीति नुठे, अति ते करित हानी ।। १ ।।

(मुली गात जाताच सिद्धार्थ गौतम आणि कौंडिन्य प्रवेशतात.)

सिद्धार्थ : कौंडिन्य हेच ते गान! ऐकलेस ना? ह्या नर्तकी हे जे गाणे म्हणत आता गेल्या ना, ते गाणे मी पूर्वी एकदा ऐकले होते. आणि तुला आश्चर्य वाटेल पण नर्तकींच्या ह्या गाण्याने एखाद्या गूढमंत्रासारखा माझ्या हृदयात दिव्य प्रकाश पाडला. आणि त्या प्रकाशात मी ह्या तपोवनाच्या घोर अंधारातून निर्वाणाचा मार्ग काढीत बोधिवृक्षाच्या तलापाशी जाऊ शकलो. स्वतःच्या देहास नि इंद्रियांस छळून, पीडून, नाशून त्याचे बलिदान केल्याने मोक्ष मिळतो असे सांगणाऱ्या तपोमार्गात काय तथ्य आहे ते त्या तपोमार्गाचा स्वतः अनुभव घेऊन प्रत्यक्ष पहावे म्हणून आम्ही या निरंजना नदीचे तीरी घोर देहदंडन करीत होतो हे प्रसिद्धच आहे. कौंडिन्य, या सकल जगतास जन्म-मृत्यु-जरा-व्याधि ह्या चार महादुःखांपासून मुक्त करण्याचे काही साधन आहे का? अशी तळमळ लागून मी जेव्हा प्रतिज्ञा केली की-

(चाल - पीतनके -) ताल-त्रिताल

विमुक्त करु हे । आर्त जगत । पासुनि जन्ममरणा ।। ध्रु. ।।

साधन शोधाया । राज्य स्वजन अरे प्राणही ।

सोडीन लोक शोक हरणा ।। १ ।।

अशा प्रबळ निश्चयाने मी ह्या दुःखमय संसाराचा त्याग करून, माझे शाक्य राज्य, माझी तरुण भार्या देवी यशोधरा, माझा नवजात तनय राहुल - माझे सर्वस्व सोडून मी ह्या वनात येऊन राहिलो. तेव्हा मी दिवसा एकेक दाणा खाऊन रहाण्यापर्यंत अनेक प्रकारची उपासतापासांची व्रते केली. पण मला ज्ञान होईना. शेवटी मी आसन्न मरण होऊन रात्रंदिवस पडलो. परंतु त्यामुळे होती; ती विचारशक्ति देखील, नष्ट झाली; मग अधिक ज्ञान मिळण्याची गोष्टच दूर. इतक्यात एक दिवस नाचाच्या मुली हे गाणे म्हणत त्या मार्गाने गात गेल्या की 'वीणेची तार अगदी ढिलाऊ नकोस; नाहीतर गीत उपजणार नाही. फार ताणूही नकोस, नाही तर वीणाच तुटेल.' तीच स्थिति इंद्रियांची, या तनुवीणेची. ही इंद्रिये अगदी लाडावाल तरीही शांतिसंगीतास आंचवाल, त्यांस फार छळाल तरीही शांतिसंगीतास मुकाल. तर या इंद्रियाश्वांची योग्य ती जोपासना करून पण

उत्तम स्वारासारखी त्यांची वागुरा हातात ठेवून जर त्यांचा उपयोग करून घ्याल तर ती सहजावस्थाच तुम्हांला ज्ञानमार्गाचा प्रवास सुखकर करील, नि अंती निर्वाण प्राप्त करून देईल. हा सिद्धान्त मला पटला आणि मी ते देहपीडन सोडले. अन्न स्वीकारले आणि युक्ताहार-विहार होत्साता त्या बोधिवृक्षाच्या छायेखाली समाधियुक्त ज्ञानमार्गाने निर्वाणाचे परमसुख अनुभवू शकलो. कौंडिन्य, जो हिंसामय यज्ञमार्गासंबंधी सिद्धान्त तोच ह्या देहदंडनात्मक तपोमार्गाविषयीही सत्य आहे काय? सांग पाहू? हिंसामय यज्ञमार्गाविषयी तथागत बुद्धाचा सिद्धान्त काय तो सांग पाहू!

कौंडिन्य : हे भगवान् बुद्धदेवा, आपला हिंसामय यज्ञाविषयीचा सिद्धान्त मी संपूर्णपणे आकलन केला आहे. प्लवा ह्येते अदृढाः यज्ञरूपाः । भाराभर शेणफाटे गोळा करा, त्याची एक थोरली होळी करा, आनंदाने बागडणाऱ्या बिचाऱ्या कोकरास आणि वासरांस त्यांचे पाय बांधून, भाजी कापावी तसे त्यांचे गळे, हदय, वसा, नसा गंभीरपणे मंत्र म्हणत चराचर कापा; आणि त्यांच्या मांसांच्या निरनिराळ्या तुकड्यांना हा इंद्राचा, हा मरुताचा, हा वरुणाचा म्हणून आगीत रक्ताच्या धारांसह जाळीत बसा! अशा ह्या रक्ताळलेल्या यज्ञाने जर देवता प्रसन्न होतात तर त्या कसाईखान्याने का प्रसन्न होऊ नयेत! हे कर्मकांड नव्हे; हे हत्याकांड आहे आणि याने देव जर खरेच प्रसन्न होत असतील तर ते देव नसून दैत्यच असले पाहिजेत! कोकरांना आणि वासरांना मारले म्हणजे म्हणे मनुष्यास मोक्ष मिळतो! कोण हे खूळ! पुन्हा यज्ञाने जो स्वर्ग मिळतो त्यातही, दुःखपूर्ण देवांच्या कथाच सांगतात की देवही मत्सर, क्रोध, भय, दुःख आणि असतोष ह्यांच्यापासून मुक्त नसतात. पण भगवान्, पशूंच्या बलिदानाने देवपितर संतुष्ट होऊन मोक्ष मिळतो ही क्लृप्ति ज्यांनी काढली ती जगास केवळ फसविण्यासाठीच काढली की काय?

सिद्धार्थ : नाही. त्यांनी हेतुपुरस्सर जगाची फसवणूक केली असे मी म्हणत नाही. ही त्यांची प्रामाणिक भूल होती. चिरंतन आणि अमर असे जगांतील मूलतत्व शोधण्याच्या आणि अशेष दुःखांपासून मुक्त होण्याचे साधन उपलब्ध करण्याच्या मनुष्यजातीच्या प्रशंसनीय प्रयत्नांची ती एक पायरी होती. तो एक बुद्धीचा भ्रम होता. पण अनुभवाने आणि विचाराने तो भास निरसन झाल्यावरही कोणचा शहाणा मनुष्य त्याला तसाच चिकटून राहील? देहदंडनात्मक तपाने मनुष्याच्या अवयवांवर आणि शक्तीवर निरनिराळे प्रयोग केले असता ती काय रूपांतरे घेऊ शकतात हे फार फार तर शिकता येईल; पण सकल दुःखांपासून मुक्त होण्याशी आणि आत्म्याच्या चिरंतन शांतीच्या प्राप्तीशी त्यांचा काहीच प्रत्यक्ष संबंध नाही. हिंसात्मक यज्ञ वा देहदंडनात्मक तप हा निर्वाणाचा मार्ग नव्हे. निर्वाणाचा मार्ग म्हणजे तृष्णानाश आणि साधना म्हणजे एवढीच की आपल्या निष्ठेप्रमाणे

अकुशलस्याकरणे कुशलस्योपसंपदा ।
सचित्तपरियादपन एतद् बुद्धानुशासनम् ।।

कौंडिन्य : ह्या तपोवनांत आपण मला देहदंडनाचे अद्भुत प्रकार दाखविणार होतात ना?

सिद्धार्थ : ये असा आंत ये - (पडदा उघडतो.) हे पहा डोक्याचे केसापासून तो पायाचे नखापर्यंत, प्रत्येक प्रसंगागणिक देहदंडन प्रकार! हे केशी पहा. एकही केस काढणे ह्यास हे पाप समजतात. डोक्याचे केस पाठीवर आणि तोंडावर, नाकाचे मिशीत आणि मिशीचे दाढीत, दाढीचे पोटावर. खाकेचे बरगड्यावर, एखादें चवाळे पांघरावे तसे हे केसाळ अंग पहा!

कौंडिन्य : पण हे कोण रागारागाने आपल्या केसांच्या जटा उपटीत आहे? याला एखाद्या दुःखाची बातमी कळली की काय?

सिद्धार्थ : नाही. तो एक केशरक्षक पंथाच्या अगदी उलट असणाऱ्या केशलुंचक पंथाचा पर्याय आहे. अंगावर एकही केस राहू देणे ह्यास हे पाप समजतात. त्यातही हे केस क्षुरिकेने काढून खरा देहदंड होणार नाही म्हणून प्रथम केस वाढवून, अशा मुठीच्या मुठी हातांनी हिसडून हे लोक केस न् केस उपटून टाकतात.

कौंडिन्य : हे कोण, हात उभारून कोणास बोलावीत आहेत की काय?

सिद्धार्थ : ते नंतर. प्रथम हे पहा, हे हात जसे जन्मतः लोंबकळत सुटले तसेच जन्मभर ठेवणे पुण्य समजतात. हे हात वर असा करीतच नाहीत. त्यामुळे त्यांची हाडे क्षीण होऊन हात पुढे, मागे, वर होतच नाहीत. यांचे उलट हे पहा खरे तप. म्हणजे हात निसर्गाविरुद्ध सारखे वर धरणे असे ह्यांचे मत. हे दोन्ही हात सारखे वरच ठेवल्याने सुकून लाकडासारखे झाले आहेत. ह्या परस्परविरुद्ध मार्गातील कोणता खरा पुण्यप्रद ते कसे सांगणार?

कौंडिन्य : पण हे कोण असे भुई चाटीत आहेत?

सिद्धार्थ : हे मृगव्रताचे अनुष्ठान करीत आहेत. हातापायांवर पशूसारखेच हे नेहमी चालतात. त्यांच्या सारखेच निजतात, बसतात आणि तसाच भुईवरील गवतपाला खाऊन जगतात. हे अगतिक पहा. एके ठिकाणी नित्याचेच बसले आहेत. पावसात गाळ साचून त्यांचेवर वारुळे बनतात, त्यात सर्प येतात, कोणी तोंडात काही घातले तर जगतात, एखादे वेळी सर्प त्यावर प्रीति करतात, एखादे वेळी डसून मारतात. हे सतत गतिक पहा, त्या अगतिकाच्या अगदी उलट. हे सतत चाललेले असतात. एका ठिकाणी राहणे तरी भोवती गरगर फिरत राहतील; पण गति बंद ठेवणार नाहीत. त्यांना पुढे पुढे चालता चालताच झोप घेण्याची किंवा झोपेतही चालण्याची सवय होते. अगदी परस्पर विरुद्ध नियम पाळणारे तपस्वी आपापल्या नियमांस सारख्याच हट्टाने पुण्यकारक आणि मोक्षकारक समजतात. आता जर गति-व्रत पुण्य असेल तर अगति-व्रत पाप असले पाहिजे; आणि अगति पुण्य असेल; तर सतत गति पाप! या दोघांत कोणी तरी एक निश्चयानेच चुकतो आहे आणि बहुधा दोघेही चुकताहेत; आनंदाची गोष्ट एवढीच की हे महानिग्रही तपस्वी त्यांच्या अगदी उलट निष्ठेच्या साधकासही विरोध न करता शेजारी शेजारी आपापली इष्ट साधने आचरीत आहेत. कौंडिन्य व्रताचे किती प्रकार सांगू तुला! नुसत्या खाण्याचे पन्नास प्रकार. कोणी रसेंद्रिय मारण्यास प्रत्येक पदार्थात अत्यंत कडवट रस पिळून खातात, कोणी निरशन व्रती. ते काहीच खात नाहीत तर कोणी सर्वाशन व्रती. ते भुकेचे वेळी जे समोर दिसेल ते खाणे

पुण्यकारक समजतात. मळमूत्र समोर दिसले तरी देखील साम्य बुद्धीने मटामट खातात. कोणी पंचाग्नीत सतत बसतात तर कोणी थंड पाण्यात सतत राहतात. हा बघ, ह्या देहदंडक तपस्व्यात अत्यंत प्रमुख म्हणून गाजलेला. खडावांस खालून खिळे मारून त्यावर पाय देताना त्यांची अणकुचीदार अग्रे याने आपल्या पायात भोसकून घेतली आहेत. हा तस्सा चालतो. मिरच्यांची धुरी पेटवून स्वतःस टांगून घेऊन हा डोळा धुपवतो. ह्याने तापल्या तव्यावर आपल्या जननेंद्रियास जाळून टाकले; आणि आता ती देहदंडाची दुःखे कमी वाटून तो परम निग्रही तपस्वी काटे खात आहे नि सुळे लावलेल्या शय्येवर सदोदित पडून राहणार आहे. आणखी -

कौंडिन्य : पुरे झाले. हे बोधिसत्वा सिद्धार्था, मला ह्या अघोरी पंथांच्या अधिक माहितीची मुळीच आवश्यकता नाही!

सिद्धार्थ : जगात मनुष्याने पाप केले तर नरकात त्याला असे भयंकर दंड भोगावे लागतात असे म्हणतात. पण पापाची जी नारकी शिळा तिलाच पुण्य समजून हे निष्पाप लोक त्या यातना आपण होऊन इहलोकीच भोगीत आहेत. आणि ह्या अशा नरकाच्या यातना सोसणे हा स्वर्गाचा सोपा मार्ग, मुक्ति, मोक्ष समजतात. हा केवळ बुद्धिभ्रम आहे पहा! कौंडिन्य, तुझ्या आईचे तुजवर प्रेम होते का? ती दयाळू होती का?

कौंडिन्य : महाराज, मी फार मायाळू होती. आईच ती! तिचे प्रेम काय वर्णावे?

सिद्धार्थ : तर मग तू उपाशी राहिलास, गवत खाल्लेस, चुलीत हात भाजून घेतलास म्हणजे तिला आनंद होई; का तू पोटभर जेवावे, धष्टपुष्ट आणि समाधानी असावे, अशी तिची इच्छा असे?

कौंडिन्य : अर्थात् मी खाऊन पिऊन सुखी, आनंदी, निरोगी असावे अशी -

सिद्धार्थ : बरे कौंडिन्य, हे लोक देवास दयाळू नि प्रजेचा मातापिता समजतात, नाही? तर मग आपल्या भक्तास उपासाने कृश करून, तापल्या तव्यावर भाजून तो दयाळू पितामाता प्रसन्न होईल, हे शक्य तरी आहे का? जिवाचा जितका अधिक छळ होईल अधिक प्रसन्न होणारा देव, हा देव नसून दैत्यच असला पाहिजे, नाही का? अद्भुत सिद्धीस्तव हे ढंग करा; पण देहदंडाने किंवा यज्ञहिंसेने दयाळू देव प्रसन्न होतो आणि मुक्ति मिळते असे समजून ही भयंकर व्रते आचारणे नि उपास करणे हा केवळ मूर्खपणा आहे. जगताचे आहे ते दुःख निवारण करण्यास निघालेल्या मला तरी या अघोर व्रतांच्या दुःखात जगास बळे बळे पाडणे क्रूरता वाटते.

एक शिष्य : (प्रवेशून) - तथागत बुद्धांनी आपली जन्मभूसि जी कपिलवस्तु तीस जाण्याची जी आज्ञा दिली तीप्रमाणे संघाची निघण्याची सिद्धता केली आहे.

सिद्धार्थ : ठीक. कौंडिन्य, चल, आमचे वृद्ध वडील महाराज शुद्धोदन, हे आम्ही त्यांस न कळत राज्य सोडून वनात निघून गेलो तेव्हापासून झुरत झुरत आता अगदी जर्जर झाले आहेत. आसन्नमरणाचे आधी एकदा तरी येऊन मला भेटून जा म्हणून केलेल्या त्यांच्या पाचारणास मानून शाक्य राष्ट्राच्या राजधानीस, आमच्या जन्मभूमीस, आम्ही भेट देण्याचे निश्चित केले आहे. त्यातही या वैयक्तिक संधीचा उपयोग एका मोठ्या जागतिक कार्याच्या साधनाकडे होण्याचा

संभव आहे. आम्ही शोधून काढलेल्या चार आर्य सत्यांचा उपदेश शाक्य राष्ट्रालाही करून ज्याप्रमाणे कोसलचे महाराज आणि मगधचे महाराज तथागत बुद्धाचे अनुयायी झाले तसेच शाक्य राष्ट्राचे राजकुलास आणि सेनानीसही अनुयायी करून या जगातून शस्त्रयुद्धाचा, हिंसेचा, यादवीचा आणि कलहाचा नायनाट करावा आणि सर्वत्र शांतीचे धर्मराज्य स्थापन करावे ह्या आमच्या उत्कट इच्छेवर सुयशाचा मुकुट चढविण्याच्या प्रयत्नांची आम्ही पराकाष्ठा करणार. कौंडिन्य, संसारासारखे दुःख नाही, हे जर मनुष्यमात्रास पटेल तर मग ह्या अत्यंत तापदायी संसारातील दिखाऊ लाभासाठी युद्धे आणि कलह होतील तरी का? विखारी सर्प डसवून घेण्यासाठी जशी कोणी शहाणा चढाओढ करीत नाही त्याचप्रमाणे ह्या संसाराच्या होळीत उड्या टाकण्याची चढाओढ जीवमात्र करणार नाही. कौंडिन्य, खरोखर संसारतृष्णेसारखे दुःख नाही. वितृष्ण संन्यासासारखे सुख नाही. पहा- त्या दूरच्या पर्वताकडे पहा, पहा तो दावाग्नि कसा पेटला आहे.

(चाल: तू आनबान वेली-)

तो वणवा बघ दूरी । जीव जंतु जाळी । भडकत दशदिशा । आग ।। ध्रु. ।।
पेटत पळ पळ तैसा । तृष्णाग्नीत । संसार जळत हाय ।। १ ।।

प्रवेश २ रा

(क्षारा बसली आहे. इतक्यांत शाकंभट प्रवेशतो.)

शाकंभट : क्षारे, पुन्हा तू ओसरीवर येऊन मांडी ठोकून बसलीस! आला गेला ओसरीवर येणार; ओसरी म्हणजे घरचा बाजार, आणि त्यात तू बसणार. आता हे दोन शब्द एकत्र करून जर मी त्या नावाने तुला हाक मारली तर म्हणशील मला शिव्या देता म्हणून! बायकांची बसायची जागा म्हणजे सैपाकघर.

क्षारा : चुप रहा! चघळ कुठले. ओसरीवर बसू नको तर काय करू. म्हणे बायकांची जागा सैपाकघरात, पण ज्या सैपाकघरात सैपाक करण्यास धान्याचा एक दाणा देखील कधी आपण मिळवून आणून दिला नाही त्या सैपाकघरात आणि ओसरीत फरक तरी काय मेला! इतर कर्त्या पुरुषांसारखे आपण ओसरीवर रुपयांचा खणखणाट झडवीत असतेत ना; तर मी पण मग इतर बसत्या बायकांसारखी सैपाकघरातल्या संसारात गुंग असते. पण कुठली मेली ही धोंड देवान माझ्या गळ्यांत बांधली आहे! माझ्या जन्माच मातेर झाले. नाहीतर कोण्या एखाद्या राजाची राणी शोभायची मी!

चाल: (अरि रंग रंगे ग्यान)

जोडा मम किती विजोड । हे ठब्बु मी छान । मी
गाय । हे गिधाड । हे बदसुर । मी तान ।। ध्रु. ।।
गूळचि मी चव ज्याला । त्याचि न हे तेचि जाण ।
मज पूर्ण मज समचि । पति दे न भगवान् ।। १ ।।

शाकंभट : काय म्हणतेस तरी काय क्षारे! शुद्धीवर आहेस का तू! अग तुला अगदी 'तुजसमचि पति', अगदी पूर्ण अनुरूप पति मिळाला पाहिजे होता असे खरोखरच का तुला वाटते? खुळे! तसे असते तर रडतीस. अग अगदी तुझ्यासारखाच जर तुझा पति असता तर तो पुरुष म्हंटला तरी स्त्रीच असता! मुलींना अगदी 'अनुरूप वरप्राप्तिरस्तु' म्हणून जे आशीर्वाद देतात त्यांना ते म्हणतात त्यांतील अनर्थ कळतच नसतो. अग, स्त्रियात आणि पुरुषांत थोडा फार जन्माचाच विजोड आहे म्हणून तर त्यांच्या लग्नाचा जोड जुळतो. ह्यासाठी तुझा पति तुझ्याशी असा थोडा विजोड आहे, अगदी तुझ्यासारखाच अनुरूप नाही म्हणून उलट देवाचे आभार मान. तसे नसते तर क्षारे रडतीस रडतीस!

क्षारा : आणि आता तरी माझ्या दैवी रडण्यावाचून दुसरे काय आहे! पुरोहितपणाचा तुमच्या वडिलांचा केवढा लौकिक. पण तो तुमच्या उधळेपणाने आणि उनाडपणाने धुळीस मिळविलात. श्रीमंत नागरिक लोकाची वृत्ति तर बुडालीच पण हे चार खेडवळ लोक दाराशी अजून येतात त्यांना तरी कांही संकल्प बिकल्प सांगून दोन पैसे मिळवावे म्हंटले! मग बोलावू त्यांना आत? दोनदा हेलपाटे घालून गेले ते. घरात न खायला न खरवडायला अशा स्थितीत श्रीमंत यजमान असला म्हणजेच उपाध्येपण करावयाचे ही वृत्ति बरी नव्हे म्हंटले.

शाकंभट : म्हंटले ते अगदी बरोबर म्हंटलेस. हा प्रश्न श्रीमंतीचा नाही. हा प्रश्न मुख्यतः श्रद्धेचा आहे. श्रद्धा ही श्रीमंतीवर अवलंबून नसून त्या श्रीपैकी तो किती श्री दान करावयास, दक्षिणा द्यावयास सिद्ध आहे ह्यावर अवलंबून आहे. कित्येक श्रीमंतांचा सुपारीदेखील पुढे ठेवण्यास जीव जातो; तर कित्येक दरिद्री जीव गेला तरी ओंजळ भरभरून दक्षिणा द्यावयास सोडीत नाहीत. तेव्हा मनुष्याच्या धर्मश्रद्धेचे माप म्हणजे तो किती दक्षिणा देऊ शकतो ह्यावर नसून तो किती दक्षिणा देऊ इच्छितो- रोख देऊ इच्छितो हे आहे. जा त्या मापाने त्यांची श्रद्धा मोज जा! सर्वांत जास्त दक्षिणा आणली असेल त्या श्रद्धावानास घेऊन ये. इतर अश्रद्धांस हुसकून दे. क्षारे जा, सांग हा तुझा पति जो शाकंभट त्याची ही आज्ञा आहे म्हणून.

क्षारा : पण अगदी दक्षिणेकडेच लक्ष देऊन कसे भागेल! एखाद्यापाशी दक्षिणा नसली तर-

शाकंभट : त्यास श्रद्धा नाही म्हणून समजावे.

क्षारा : पण आपण भिक्षुक म्हणून तर हे दहा यजमान दाराशी येतात ना! परंतु-

शाकंभट : पुरे झाले तुझे पण नि परंतु! म्हणे दहा यजमान दाराशी येतात! बायकांनी एका नवऱ्यास काय ते यजमान म्हणावे. मी एक यजमान तेवढा पुरे आहे. जा. हं, थांब! हे पहा, दक्षिणा सगळ्यांत अधिक देणारा असून आणखी तो अशिक्षित असावा अं. नाकापेक्षा जड मोती जसे तुला आवडत नाही तसा पुरोहितापेक्षा अधिक शिकलेला यजमान मला आवडत नाही. जा!

(क्षाराबाई जाते नि अडाणी शेतकऱ्यास घेऊन येते.)

शेतकरी : पाया पडतो द्येवा.

शाकंभट : कल्याण. (क्षारेस) तू जा आता घरात. जा म्हणतो न! परपुरुषाच्या समोर बायकांनी ओसरीवर असे उभे राहणे पसंत नाही मला.

क्षारा : ही घ्या जाते एकदाची!

शाकंभट : (स्वगत) खेडवळच दिसतो. (उघड) काय तीर्थविधि करावयाचा आहे की श्राद्ध की स्नानसंकल्प! असा घोटाळतोस का? संस्कारांची ही संस्कृत नाव तुला प्राकृताला कळत नसतील म्हणून प्राकृतात तेच विचारतो. ऐक! दक्षिणा म्हणून किती रुपये आणले आहेस? चाळीस, की तीस, की वीस?

शेतकरी : (स्वगत) असे काय? ह्याला पण संधि साधून थोड प्राकृत शिकवायाच व्होव. (उघड) द्येवा पांच रुपये दक्षिणा आणली आहे.

शाकंभट : तर मग उभ्या संस्कृतात त्या नांवाचा धर्मविधिच नाही. दहा रुपये कमीत कमी हवेत!

शेतकरी : बरे द्येवा, तेवढे देईन कसे तरी करून.

शाकंभट : ठीक आहे. प्राकृतात ज्यास दहा रुपये म्हणतात त्या संस्कारास संस्कृतात स्नानसंकल्प म्हणतात. चल हो तीर्थसंकल्पास सिद्ध!

शेतकरी : पण तीर्थावर जायला व्होव ना?

शाकंभट : वेड्या. प्रत्येक पुरोहिताच घर म्हणजे तीर्थच असते! मी दर्भाने पाणी शिंपडले तर सामान्य तीर्थाच पुण्य लाभत. बोटान शिंपडले तर प्रत्यक्ष भागीरथीच स्नान केल्याच पुण्य लागते. चल, तू संकल्प म्हण. मी पाणी शिंपडतो. मग तू नदीवर जाऊन सगळा दिवस डुबक्या मार, नाहीतर उभ्या जन्मात पुन्हा स्नान म्हणून करू नकोस. तुला स्नानाचे पुण्य लाभल्यावाचून राहणार नाही. हं. मांडी घाल. दक्षिणा काढ, मोज, ठेव इथे; जोड हात. जो जो शब्द मी तुला सांगेन तो तो नीट म्हण. मी हाताने खुणा केल्या की, तसे हात तूही कर हं, सावध! बोल, तुझे नाव काय? हं. ॐ नमः!

शेतकरी : बोल, तुझे नाव काय? हं. ॐ नमः!

शाकंभट : अंहं. काय नाव ते सांग, बोल ॐ नमः!

शेतकरी : अंहं. काय नाव ते सांग, बोल ॐ नमः

शाकंभट : तुझे नाव प्रथम; मग ॐ नमः

शेतकरी : तुझे नाव प्रथम; मग ॐ नमः

शाकंभट : हत् तुझी, नुसत ॐ नमः

शेतकरी : हत् तुझी, नुसत ॐ नमः

शाकंभट : काय गाढव आहेस?

शेतकरी : काय गाढव आहेस?

शाकंभट : पाजी कुठला!

शेतकरी : पाजी कुठला!

शाकंभट : तुझा बाप पाजी.

शेतकरी : तुझा बाप पाजी.

शाकंभट : (दक्षिणा उचलून) चोरा!

शेतकरी : (दक्षिणा हिसकावून) चोरा!

शाकंभट : घे तर! (ठोसा देतो)

शेतकरी : घे तर! (उलट ठोसा) (शेवटी लगदालगदी होते. शाकंभटाचा कान धरून शेतकरी त्यास मान दाबून वाकवितो.)

शाकंभट : अयायायी! अहो धावा! अग आई, अग आई! (क्षारा दारातून डोकावते आणि पळते) अग ये परत कशी जातेस! अग आईऽ!

क्षारा : आईला हाक मारीत आहा ना! मग तुमची आई येईल स्वर्गातून खाली; पुन्हा म्हंटले बायकांनी ओसरीवर येणे आवडत नाही आपल्याला.

शाकंभट : अग आवडते - बाप रे! अग! आई नाही, तू ये! तू क्षारे, अहो क्षाराबाई, अहो क्षाराबाई महाराज! धाव ग!

क्षारा : (प्रवेशून) शेतकरीबुवा, सोडा त्यांना! माझ्यासाठी ते जे काय बोलले असतील ते क्षमा करा. फटकळ आहे त्यांची जीभ जरा. दया करा! (शेतकरी कान सोडतो. शाकंभट धूम घरात पळत जातो. क्षाराबाईस नमस्कार करून शेतकरी जातो.)

शाकंभट : (जुनी तलवार घेऊन हळूनच दाराबाहेर डोकावून) अग, गेला का तो? (क्षारेने हसून 'गेला' म्हणून मानेने खुणावताच बाहेर येऊन मोठ्याने) गेला की काय तो! कुठे पळाला भ्याड! काय करू ग! आता इथे असता तर त्याचे तुकडे केले असते तुकडे! तू त्याला का सोडलास? मी तुझी परीक्षा करण्याकरिता त्याच्या हाती कान दिला होता! ते तुला खरे वाटून फटकळ जिभेचा म्हणून तू मला शत्रूसमोर म्हणालीस! आणि आता माझ्या शत्रूला पळून जाण्यास सांगून प्राणदान दिलेस. कळले तुझे कपट. क्षारे, तू परपुरुषाशी बोललीस का? नवरा हा बायकोचा राजा! तू त्याचा द्रोह केलास! म्हणून राजविद्रोहाच्या निर्बंधानुसार तुझी मानच उडवितो! माझी जीभ फटकळ आहे म्हणून म्हणालीस नाही, माझी तलवार माझ्या जिभेहूनही फटकळ आहे. बोल का मध्ये पडलीस? जर का तो भ्याड आता इथे येईल! भ्याडा ये पाहू! -

शेतकरी : (पुन्हा प्रवेशून दटावीत) काय?

शाकंभट : (पाठीमागे हात लपवून तलवार टाकीत क्षारेच्या पाठीशी होतो आणि तिला डवचून) मला वाटले तो दूर निघून गेला म्हणून! अग पड मध्ये पड, काढ त्याची समजूत.

क्षारा : मी नाही काढीत त्याची समजूत! परपुरुषाशी उभ्या उभ्यादेखील बोलायचे नसते बायकांनी; मग त्यांच्या मध्ये पडण्याची गोष्टच दूर.

शाकंभट : नवऱ्याने सांगितल्यावर परपुरुषाशी उभ्या उभ्या बोलावयास तर काय, पण मध्ये पडावयासही हरकत नाही. समजीव त्याला! त्याच्या त्या चक्रासारख्या गरगरत्या डोळ्यांस पाहून, क्षारे, माझे डोके गरगर फिरून चक्कर येते आहे.

क्षारा : भल्या माणसा, तू जा आता! यांची ही केविलवाणी स्थिति पाहून तुला राग न येता उलट हसू यावे. बरे जा हो बाबा! (शेतकरी नमस्कार करून जातो; इतक्यात बाण येतो.)

शाकंभट : कोण? बाण! राजपुत्र सिद्धार्थाच्या, आजकालच्या बुद्धाच्या, विलासभवनाच्या तटावर तुझा पहारा असे नव्हे काय? काय अभागी मनुष्य हो तो सिद्धार्थ, हा आजचा बुद्ध. यशोधरेसारख्या एकाहून एक सुंदरीच्या फुलशेजेहून त्याला मसणवटीच्या राखेत लोळणे बरे वाटले!

बाण : त्यांना बरे वाटले; पण त्यांनी टाकलेली त्यांची पत्नी ती देवी यशोधरा धाय धाय रडते आहे. बिचारीची केविलवाणी स्थिति ही!

शाकंभट : अग ए, ऐकलस ना नवऱ्याने टाकले तर बायकांची काय दुर्दशा होते ती! म्हणून म्हणतो मला जतन करून ठेव नाही तर-

क्षारा : काय, नाही तर काय? राजपुत्रासारखा थोर, पराक्रमी पति होता म्हणून तिला सोडून तो वनवासास जाताच यशोधरा शोकाकुल झाली. पण ज्यांच्या गळी असा खैस पडतो ना त्या स्त्रियांना आपल्या नवऱ्याला वनवासास जाण्याची तरी बुद्धि होवो म्हणून उलट नवस करावेसे

वाटतात, नवस! हो, ज्यांच्या संगतीत सहवास खराच सुखकारक होतो त्या नवऱ्याने वनवास स्वीकारला तर दुःख! पण ज्या नवऱ्यांच्या पायी माझ्या सारख्यांचा गृहवासच वनवासासारखा कष्टाचा होतो ते नवरे उद्या वनवासास जायचे ते आज जाइनात का? जाता का आत्ता?

शाकंभट : गेलोही असतो; पण तू म्हणतेस त्याप्रमाणे आपला गृहवासच वनवास असल्याने आता वनवासात विशेष ते काय राहिले! वनात रानडुकर असतात आणि (क्षारेकडे हात करून) इथे नसतात की काय!

क्षारा : (शाकंभटाकडे हात करून) - असतात तर! सिद्धार्थासारख्या - ह्या बुद्धासारख्या त्यागवीराच्या निंदेच्या चिखलात तोंड खुपसण्याच हे आता केलंत तसे कृत्य रानडुकरावाचून कोण करणार!

शाकंभट : त्यागवीर! अग, ए अग! त्याला तू आत्ता त्यागवीर म्हणालीस एवढा सिद्धार्थाने अपूर्व त्याग तो कोणता केला! सिद्धार्थासारखे जन्मापासून ओ येईतो सर्व विलास भोगल्यावर त्यांचा वीट कोणालाही येईल. यशोधरा, मधुरा, मंजुला अशा एकीहून एक अनेक चंद्राननांच्या थंडगार आलिंगनात तारुण्याचे रागरंग तीस वर्षे अहोरात्र भोगल्यानंतर त्याला थोडी थंडी वाजू लागून थोडा वेळ वनातील वणव्याजवळ शेकत बसावेसे वाटावे यात आश्चर्य ते काय आणि वीरत्व ते कोणते? तीस वर्षे तर राहूच दे; पण वनवासात निघून जाण्याचे अटीवर जर मला कोणी तीस दिवस तरी अशा एखाद्या विलासभवनातील सुंदरींच्या दलभारावरचा सरसेनापति नेमील ना तर मी त्या करारावर आत्ता सही करतो! अशा विलासभवनात तीस दिवस लोळू द्यावे, त्याचे महिन्याचे भाडे म्हणून आपण एकतिसाव्या दिवशी सुखाने वनात चालते होऊ. पण आमची घराची हौस फिटणार कशी? जे एक पदरी पडले आहे ते असे पात्र! मग आमच्या भोगविलासांची अतृप्त भुते अजूनही गृहस्थाश्रमाच्या भोवतीच घुटमुटळत राहावी यात आश्चर्य काय? आणि अग ए, अग सिद्धार्थ, हा बुद्ध, यशोधरेस टाकून निघून गेला म्हणजे काही जगातून उठला असे थोडेच आहे! राजविलासांच्या पक्वान्नांनी तोंड विटले म्हणून तिखट, तुरट, आंबट चटण्या तोंडी लावण्यास स्वारी गेली आहे दोन दिवस कुठे तरी. झक्कत परत येईल परत! राजा म्हणूनच आला तर ह्या अंतःपुरातील राणीवसा आहेच; बैरागी होऊन आला तर ह्यांचाच बैरागिणी वसा करून सोडील. मिळून एकच. अग ए, अग, पुरुषांना स्त्रीरत्ने ह्या नाही त्या ढोंगाखाली अंगावर धारण केल्यावाचून राहवतच नाही. गृहस्थ काय, नि वनस्थ काय, कामिनीवाचून फार फार तर चार दिवस राहतील; पण पांचव्या दिवशी परत पावली प्रायश्चित्त! जपी असोत, तपी असोत, शिखी असोत, संन्याशी असोत; कोणी प्रिय पत्नी म्हणून जवळ ठेवतील तर कोणी प्रिय शिष्या म्हणून! कोणी अनुरागिणी म्हणून तर कोणी बैरागिणी म्हणून! रामचंद्र जानकीच्या वदनकमलाचे दास तर हनुमान तिच्या चरणकमलाचे - पण मिळून ललनांचे दास! तेव्हा सिद्धार्थ गौतमांच्या वनवासाच एवढ स्तोम माजवून आम्हा गृहस्थांना हिणविण्याची एवढी घाई करू नकोस. यशोधरेच्या मागे मागे ह्या बुद्धाची स्वारी आज ना उद्या पुन्हा परत न आली तर माझे नाव दुसरे!

क्षारा : चूप रहा! थोर मनुष्य पाहिला की त्याची निंदा करण्याची चटकच आहे आपल्याला.
शाकंभट : चूप रहा! मी कोणाची निंदा केली की त्याला थोर म्हणायची चटकच आहे तुला!
क्षारा : आज सिद्धार्थाची निंदा करण्याच्या भरात का होईना, पण कामिनीचे पुरुष दास असतात हे तर मान्य केलंतच की नाही!
शाकंभट : हो, कामिनीचे; अशा कैदासणीचे नव्हते!
बाण : पुरोहित महाराज! मला काही निकडीचे काम आहे. मी विलासभवनाभोवतीच्या तटावरील पहारेकरी हे आपण जाणताच. सिद्धार्थ पळून गेला त्या दिवशी तटाची दार मी उघडी केली म्हणून मजवर आरोप आला आहे. वर्षानुवर्ष या नाही त्या उपायान मी कालहरण केले पण आता काळ माझे हरण करणार खचित. मला महाराज प्राणदंड देणार म्हणतात. काही बुद्धि सुचत नाही.
क्षारा : म्हणून तू बुद्धि मागावयास ह्यांच्याकडे आलास की काय?
बाण : नाही बाई, रागावू नका! भलतीच गोष्ट भलत्याच ठिकाणी कशी मागू; पण भटजी महाराज संकटनिवारक मंत्रित ताईत देतात असा लौकिक ऐकला; म्हणून आलो!
शाकंभट : देहदंडाच्या संकटाचा ताईत ना? निदान पाच तोळे सोने हवे?
बाण : ब ब ब ब! तीन तोळे नाही का पुरणार?
शाकंभट : बाबा, जो देह तुला वाचविणे आहे तो तीन महाभूतांचा का आहे? पंचमहाभूतांचा देह म्हणून पांच तोळे सोने! हं, पैसे काढ-
बाण : सुनासशेटजीचा हवाला देतो.
शंकरभट : कोण सुनासशेट? त्यांचे तर आम्ही पिढीजात उपाध्याय. उत्तम. बरे, आता तू असे सांग की सिद्धार्थ पळाल्याच्या रात्री काही अद्भुत गोष्टी घडल्या म्हणून गावात एक गप्प उठली आहे; तुला काही तसे अद्भुत घडल्याच माहीत आहे का?
बाण : हो तर. एक अद्भुत गोष्ट घडली खरीच. त्या रात्री तटाच दार बंद करण्याचे आधीच मला पहाऱ्यावर उभा असताना बसावेसे वाटले, नंतर निजावेसे वाटले, नंतर गाढ झोप लागली! पण आता ही अद्भुत गोष्ट सांगू कोणत्या तोंडाने?
शाकंभट : (हसून) वा बाणा वा! थोडक्यात म्हणजे पहाऱ्यावर पेंगून तू निजलास; हेच ना ते अद्भुत! बरे आणखी काही अद्भुत घडले?
बाण : नाही घडले!
शाकंभट : घडले.
बाण : नाही घडले, महाराज!
शाकंभट : बाणा, तुला जगायचे की मरायचे?
बाण : जगायचे महाराज.
शांकभट : मग म्हण घडले. अद्भुत घडले.
बाण : घडले. अद्भुत घडले. पण ते कोणचे?

शांकभट : ते असे की तुम्ही पहाऱ्यावर असता दारे बंद केलीत. कड्या, कुलपे, अडसर, आकडे, खाड्खाड् पक्केपणी लावलेत. पण इतक्यात कोण्या देवदूताने येऊन तुमच्या डोळ्यांवरून हात फिरवला आणि म्हणाला, मूर्च्छित व्हा! आणि तुम्ही सगळे मूर्च्छित झालात ते सकाळी पहाटे सावध होऊन पाहता तो दारे बंदची बंद. मध्यंतरीचे काही आठवत नाही; असे सांगायचे अगदी पाठ करून! बाकी काम माझा ताईत करील.

बाण : परंतु-

शाकंभट : चूप. हे असच म्हणायचे. अरे वेड्या, ह्या भाबड्या श्रद्धावान लोकाचा लोकापवाद टाळण्यास दैवी चमत्काराची ढालच उपयोगी पडते. उपवर कुंतीला लग्नाआधी मूल झाले. आला लोकापवाद! वास्तविक त्यात काहीच अपवाद नव्हता. हा नियमच आहे. पण त्या कानीन पुत्राविषयी जेव्हा लोकापवाद येतोच असे पाहिले तेव्हा व्यासांनी सूर्यमंत्राच्या दैवी चमत्काराची दिली बात झोकून आणि वेडगळ शंकेचे लबाड उत्तराने समाधान झाले. तसेच आज होईल. इतकेच नव्हे, तर जर पुढे मागे सिद्धार्थ गौतम खरोखरच एखादा मोठा धर्मसंस्थापक झाला तर त्याच्या अनुयायांच्या नव्या पुराणातही मी सुचविलेली भाकड कथाही धर्मकथा म्हणून मोठा गौरव पावेल. व्यासाप्रमाणे तिच्या योगे माझे नाव त्या पुराणात जरी झळकल नाही; तरी कोणी सांगावे, एखाद्या नाटकाच्या कथौघावर तरंगत ते भावी पिढ्यांच्या घाटास लागणारच नाही म्हणून! बरे चल आत, तुला ताईत देतो.

(जातात.)

प्रवेश ३ रा

(शुद्धोदन महाराज उभे आहेत.)

सेनापति विक्रमसिंह : (प्रवेशून) शुद्धोधन महाराजांचा जयजयकार असो!

शुद्धोदन : यावे! सेनापति विक्रमसिंह, यावे! काय काल आलेल्या व्यापाऱ्यांनी दिलेली बातमी सत्य आहे ना! माझा मला पूर्वी सोडून गेलेला पुत्र सिद्धार्थ एका जगद्‌गुरूचा मान पावून मला भेटण्यास परत येत आहे हे निश्चितपणे कळले ना?

विक्रमसिंह : अगदी निश्चितपणे! आपले पुत्र सिद्धार्थ वैतागून जगताची अखिल दुःखापासून मुक्तता करण्याचे महान् हेतूने राज्यत्याग करून गेल्यानंतर त्यांनी देहदंडनाची अतिशय घोर तपस्या केली. परंतु देहदंडनाची तपे ही मोक्षाची मुख्य साधने नव्हेत अशी निश्चिती होऊन ते ज्ञानमार्गाने आपले ध्येय गाठू निघाले आणि शेवटी समाधीची परम सिद्धि संपादिते झाले. तथापि निर्वाणपदी पोचल्याचे आत्मसमाधान उपभोगीत असताही केवल लोककल्याणार्थ त्या निर्वाणाचा मार्ग जगतास उपदेशीत हिंडू लागले. मनुष्यास जन्म, मृत्यु, जरा, व्याधि ह्यांच्या पंज्यातून सोडविणारा मार्ग आपणांस सापडला अशी त्यांची अढळ निष्ठा आहे. सहस्त्रावधी लोक, राजे आणि महाराजे बुद्धाच्या भजनी लागते आहेत. परंतु बुद्ध भगवानांच्या ह्या परमोदार आणि परम कारुणिक धर्मांचे मुख्य प्रवर्तक सूत्र 'परिणामतापसंस्काराद् गुणवृत्तिविरोधाच्च सर्वमेव दुःखे विवेकिनः' असे असल्याने ह्या दुःखपूर्ण जगाचा त्याग शक्य तितक्या लौकर करावा आणि संन्यास घेतल्यानेच तो पूर्ण त्याग शक्य होतो असा त्यांचा सिद्धांत ठरलेला आहे. त्याप्रमाणे ते जे सहस्त्रावधि लोकास संन्यास देत चालले आहेत तेवढी गोष्ट मात्र लोककल्याणास विघातक होणारी आहे, असे मला वाटते आणि म्हणूनच मी ते प्रत्यक्ष भेटताच याची चर्चा करणार होतो. तो प्रत्यक्ष भेटीचा समय सुदैवाने आज आलाही. भगवान् बुद्ध ह्या त्यांच्या राजधानी कपिलवस्तूस परतभेट देण्यास निघून नगरापासून जवळ आलेही आहेत.

शुद्धोदन : अहाहा! आज माझा तनय सिद्धार्थ नऊदहा वर्षांच्या वियोगानंतर मला भेटणार तर! वार्धक्यात तोच माझी यष्टि आहे. तो येताच त्यास ह्या मुकुटाची राजदीक्षा देऊन मी संन्यासदीक्षा घेईन. राजधानी उत्तम प्रकारे शृंगारली आहे ना? तो येताच नाच, चौघडे, तूर्ये, शृंगे, नगारे, हा पहा चौघडा झालाच, पण पुन्हा बंद का झाला? माझा पुत्र कसा दिसेल, कसा वागेल? मला पळ पळ युगासारखे वाटते आहे! (इतक्यात दूत येतो.)

विक्रमसिंह : काय रे चौघडा एकदा होऊन बंद का झाला? सिद्धार्थ नगरपरिघावरून दिसले का?

दूत : दिसले काय विचारता? महाराज, ते नगरात प्रवेशले देखील!

शुद्धोदन : तर मग दशदिशा माझ्या पुत्राच्या स्वागताच्या वाद्यांनी आणि जयजयकारांनी अजूनही निनादून का दिल्या नाहीत? ही केवढी घोडचूक!

दूत : क्षमा असावी महाराज! पण ती पहिली सूचना देणारा परिघद्वारावरचा चौघडा सिद्धार्थांनी पहिले टिपरू पडताच बंद केल्याने नगरद्वारावरील मंडळी गोंधळात पडली. पुनःपुन्हा चौघडे वाजू

लागावे तो सिद्धार्थांनी ते पुनःपुन्हा बंद ठेवावे. इतक्यात मुख्य महाद्वार सोडून राजपुत्र सिद्धार्थांनी आडमार्गेच नगरात प्रवेश केला आणि मिरवणुकीचा नियोजित आणि शृंगारित पथ टाळून ते जाणून बुजून ज्या भागात हीन दीन अस्पृश्य वस्ती आहे त्या गदळ, अरुंद आणि बहिष्कृत वाटांनी भिक्षा मागत आणि स्वीकारीत जात आहेत. आणि अलोट जनसमुदाय मुख्य मार्गाशी थबकून ते दृश्य पहात आश्चर्यचकित होऊन उभा आहे!

शुद्धोदन : काय? माझा पुत्र, महाराज शुद्धोदनाचा तनय, ह्या शाक्य राष्ट्राचा युवराज स्वतःच्या राजधानीत अस्पृश्यांच्या दाराशी भिक्षा मागत हिंडत आहे? कलंक लावला या कार्ट्याने माझ्या उभ्या कुळास? क्षत्रियांच्या राजकुळात जन्मून भिक्षा मागतो! ज्यांच्या सावलीचा विटाळ, त्यांचे अन्न घेतो! अरे दूता, ते अस्पृश्य तरी त्याला भिक्षा घालण्यास धजले कसे? माझ्या क्रोधाची त्यांना भीति कशी वाटली नाही?

दूत : महाराज बुद्धदेवांस -

शुद्धोदन : कोण बुद्ध? कोणता बुद्ध? कसला बुद्ध? तो सिद्धार्थ गौतम आहे. तेव्हा निदान मजसमोर तरी त्याला सिद्धार्थच म्हंटले पाहिजे.

दूत : क्षमा असावी! एका आपणांवाचून सिद्धार्थांना या अस्पृश्यान्नाच्या संसर्गापासून परावृत्त करण्यास कोणीही समर्थ नाही.

शुद्धोदन : प्रधानजी, चला आत्ता माझा घोडा आणवा. हा अनाचार मला थांबविलाच पाहिजे. वृद्ध झालो असलो तरी शाक्यांचा मी राजा आहे. त्या मानी राष्ट्राच्या आणि कुलाच्या ब्रीदास कलंक लावणारे हे सिद्धार्थाचे बंडखोर वर्तन मला दंडिलेच पाहिजे. घोडा आणा, जा! जा! आणि लोकास मार्ग मोकळे करण्यास सांगा. नाहीतर मी दाटीतूनच घोडा भरधाव फेकण्यास कमी करणार नाही.

प्रवेश ४ था

(शाकंभटजीचे घर; शाकंभट बसले आहेत, क्षारा मोठ्याने ओरडत येते.)

क्षारा : ऐकल का? तांदूळ नाहीत तांदूळ! आज दहा दिवस झाले, घरात चार दाणेसुद्धा नाहीत. माझ्या माहेरून मी आजवर आणलेले तुम्ही गटागट खाल्लेत, पण आता त्यांनी उद्यापासून शीतदेखील देणार नाही म्हणून निक्षून सांगितले आहे. म्हणून म्हणते प्राणनाथ, 'तांदूळ नाहीत तांदूळ!' आले ऐकू आता तरी?

शाकंभट : हात्तेच्या, मग प्राणप्रिये, कालच का नाही, जसे आता हळूच समजून सांगितलेस तसे, मला समजून सांगितलेस? क्षारे, चेष्टा नाहीत, ह्या एका दिवसात एक हजार तरी रुपये मिळवणार. मी हा तुझा नवरा, हा मी मिळवणार. राजपुत्र सिद्धार्थ पळून गेले त्यासंबंधी बाणाला मी ताईत दिला ना, त्याचा हवाला सुनास शेटजीनी घेतला होता, पण त्या वाणगटाने अजून एक पै देखील मला दिली नव्हती. त्यास धरला आहे पेचात. आता एक हजार मागणार एक हजार!

क्षारा : मागाल दहा हजार पण पटतील तेव्हा ना! तो शेटजी भोळसट असला तरी चिक्कू आहे. पुन्हा तुम्हांला त्याचे हजाराच देणे आहे. त्यात तर तो वळवून घेणारच आहे.

शाकंभट : अग ते रोखे तर फाडून घेतोच; पण वर आणखी रोख हजार घेणार! मला ह्या गावातील लोकाबरोबर तो वाणीही नाही तरी कुटाळ म्हणतोच. आता कुटाळ तर कुटाळ! त्या शेटजीला टाळ कुटायला लावीन तरच नांवाचा कुटाळ! नाव तरी काय म्हणे सुनासशेट-

क्षारा : का? सुनास नाव खरेच शोभत बरे का त्या शेटजीना. त्याचे नाक खरेच कसे तरतरीत आहे!

शाकंभट : हं, अग, ए अग, परपुरुषांची नाके तरतरीत आहेत की थलथलीत, डोळे पाणीदार आहेत की पिचपिचीत हा अभ्यास करण्याची तुझी खोड मला मुळीच खपणार नाही अं. तुझ्या वयाला चांगली पंचविसावी उलटत आली. आता तरी जात्यायेत्या पुरुषांची तोंडे पाहण्याचा चटोरपणा पुरे झाला.

क्षारा : तेवढाच राग असेल तर पतिराज शांत व्हा. कारण त्या शेटजीचे नाक तरतरीत आहे हे मी माझ्या वयाच्या विसाव्या वर्षीच पाहिले होत चोरून. पंचविसाव्या नाही हो. मग तर हरकत नाही ना? आणि चटोरपणाविषयी विचाराल तर आम्ही स्त्रिया जात्यायेत्या पुरुषास पाहतो यात चटोरपणा तो कसला? रस्त्यावरील कावळे, कुत्रीं, रेडे यांना नाही का आम्ही स्त्रिया पाहात - तसेच तुम्हा पुरुषांस पाहतो. एकेका मुलीभोवती छप्पन्न देशीचे पुरुष गोळा होऊन स्वयंवराचा प्रतिष्ठित गुंडपणा जसा करतात, काय मारामाऱ्या, हाणाहाण्या, लठ्ठालठ्ठी - मेली मांजर कुत्रीं देखील असली आपली निलाजरी भांडणे त्या तुमच्या सीतास्वयंवराहून नि रुक्मिणी स्वयंवराहून किंवा आमच्या सिद्धार्थ बुद्धाच्या यशोधरा स्वयंवराहून अधिक मर्यादेने भांडतात? तसे कधी पाचपन्नास स्त्रियांनी जमून एका पुरुषापुढे हलकट लाळघोटेपणा केला आहे का? कोणा पुरुषाचे गावच्या गढीसारखे वर आलेले नाक सहज डोळ्यांना दिसल तर तो स्त्रियांचा निलाजरेपणा होतो.

पण तुमचे पुरुष? शंभर कौरवांनी भर सभेत आपल्या भावजयीस नग्न करण्यासाठी वस्त्रहरण देखील केले तो पुरुषांचा सभ्यपणा!-

(चाल-अदख् भुजतया खेलिये)

निलाजरी स्त्री वदताना । लाज कशी वाटे न नरांना ।। ध्रु. ।।

नग्न करू नरा कधि का लाखो । स्त्रिया

झोंबल्या हासत खो खो । द्रौपदीस नर जैसे नाना ।। १

आम्हां स्त्रियांना पाहताच मोठमोठ्या ऋषींच्या तोंडाला सुटलेल्या लाळेन तुमच्या पुराणाच पान नि पान भिजून गेल आहे भिजून! पुराणलेखकांस स्त्री दिसली रे दिसली की लागले पाघळायला तिच्या वर्णनात-सुंदर. सुकेशी, सुमुखी, सुदती, सुमध्यमा, पृथुजघना, सिंहकटी-जशी काही मेल्यांनी मापच घेतली होती त्या साऱ्या जणींच्या अंगांप्रत्यंगाची! सिंहकटी, पृथजघन तर दूरच, पण मला जर कोणी नुसत रंभोरू म्हंटले तरी देखील पायातली चप्पल काढून मारीन चप्पल!

शाकंभट : ठीक बोललीस, तुला पाहिलेला कोणचाही पुरुष तुला रंभोरू, सिंहकटी असे नसतेच काहीतरी म्हणेल तर मी देखील (तिच्याकडे बोट दाखवून) हा माझा जोडाच काढीन बाहेर! आणि उघडकीस आणीन त्याचे आंधळेपण! हो सिंहमुखी म्हंटले तर म्हणोत तुला कोणी- पण सिंहकटी म्हणजे काय? सुदती, सुभ्रू, सुंदरी, सुकेशा तुझ्या कोणत्याही अवयवाला अंगाला, उपांगाला प्रत्यंगाला किंवा त्याच्या समुच्चयाला 'सु' हा प्रत्यय, हा 'सु' कार जो एकदादेखील लावू धजेल त्याला मी पश्चातापाचे सुस्कारे सोडण्यास अनेकदा भाग पाडीन! बाकी तुझ्यावर जर कधी पुराण रचण्याचा प्रसंग आलाच तर सध्या अगदी तुझ्या मनाप्रमाणे वर्णन करणारा एक नवीन ऋषि उत्पन्न झाला आहे खरा तुझ्या सुदैवान. सुमुखी म्हणून म्हणणाऱ्या जुन्या व्यासाच्या दृष्टिची तुम्हां स्त्रियांना आता मुळीच भीती नको. हा नवा ऋषि म्हणजे राजपुत्र सिद्धार्थ गौतम! आताशी बुद्धपदास पावले आहेत म्हणे? ते तुला किंवा कोणत्याही स्त्रीला सुमुखी तर काय पण दुर्मुखी म्हणण्या इतका देखील उल्लेखाचा मान देत नाहीत. कारण ते तुमचे मुख मुळी पाहूच इच्छीत नाहीत. स्त्रियांचे मुख पाहणे हेच पाप आहे असे म्हणे ते सांगतात! गदळ, श्लेष्मा वाहणारे तुमचे नाक, घाण येणारे तुमचे तोंड अशा ह्या अमंगल स्त्री देहाची बुद्ध अत्यंत घृणा करीत असतात-वाऱ्यास उभे राहू देत नाहीत तुम्हा पापयोनी योषितांना!

क्षारा : स्वतः जन्मास येण्यापूर्वी दोनचार वर्षांचे आधी जर एखादा प्राणी स्त्रियांस पापयोनी म्हणेल, तर त्यास मी पण क्वचित् पुण्य पुरुष म्हणेन. पण जो एकदा स्त्रीच्या पोटी आला, तो जेव्हा त्या स्त्रियांना घाणेरड्या म्हणतो तेव्हा त्याच वाक्यासरशी तो स्वतःस घाणीतला किडा ही बहुमानाची पदवी अर्पण करून घेतो. स्त्रियांचा देह अमंगळ म्हणून त्यांना वाऱ्यास उभे करू नये असे म्हणणाऱ्या गुरुमहाराजांच्या भोवती शिष्यांचा घोळका असतो त्यांचा वारा अगदी मलयानिलासारखा सुगंध मंगलच असतो नाही? आणि स्वतः गुरूंचा देह? मग या गुरूंच्या देहाच्या वाऱ्यास दुसऱ्यांनी का उभे रहावे! पण त्यांच्या तर पायाचे तीर्थ लोकानी प्याले पाहिजे!

स्त्रियांचे नाकातून श्लेष्मा येतो आणि तुमच्या व्यास-वाल्मिकी किंवा एखाद्या बुद्धांना जेव्हा पडस येत - आणि सगळ्या जगाची व्याधी हरपू निघालेल्या गौतम बुद्धांनाही म्हणे पडस येतेच - तेव्हा त्यांच्या नाकातून एखाद्या गंगोत्रीसारखे भागीरथीच पवित्र पाणी वाहत असते? मग तुम्ही त्यांचीच आचमन का नाही घेत संध्येला! आणि घेतही असाल बाई. कारण परवाच नाही का, स्त्रियांना घाणेरड्या म्हणून निदणारे कोणीसे परमहंस आले होते. ते म्हणे नेहमी पसरलेले असते अंथरुणावर. त्यातच देहधर्म करीत, तेच मलमूत्र वेळेवर स्वतःही खात आणि शिष्यांच्याही तोंडाला फाशीत! पण तो गुरुमहाराजांचा मळ; प्रसाद तो! मोठा गोड लागते असेल नाही? आपणही गेले होतेत तिकडे; उपभोगिलात की नाही थोडासा? मेली ती डुकर बरी अशा पुरुषांपेक्षा. इश्श गऽ ऽ बाई! हो, पण विसरतच होते. बुद्ध स्त्रियांविषयी काय म्हणतात तेवढे तुम्ही मला सांगितलंत पण स्त्रियाही बुद्धांना उलट आहेर काय देतात ते नाही सांगितलंत ते? कालच मगधाची एक स्त्री आली होती. त्यांच्या गावी बुद्ध आले तेव्हा त्यांना भीक घालणाऱ्यांच्याच भाविक पोरासोरांस ते त्यांच्या भीकमाग्या संघात घेऊन गेले आणि ती घरे धुळीस मिळाली. त्यांचे शिष्य थापा मारीत की त्यांचे गुरु सगळ्या जगास रोगाभोगापासून बरे करतात. आणि पाहतात तो त्याच गावी ते बुद्ध गुरु पडशाने इतके आजारी झाले की बोलून सोय नाही? तेव्हा तेथील बायाबापड्यादेखील त्यांच्यावर गमतीची गाणी करून म्हणू लागल्या. त्या बाईने एक गाणे म्हणून देखील दाखविले मला - काय ग बाई ते हो असेच ते

(चाल: चलो रे मायी औवलीया.)

माझा ग गुरू बाई । भीक दे जो । भिकारी त्यासचि करि पाही ।। ध्रु. ।।

अवघ्या जगवू जगासि आला ।

पडशापायी आपण मेला । वरही जयाचा बरवा । शाप म्हणवी ।। १

शांकभट : उगीच नाही म्हंटले तुला सिंहमुखी म्हणून! बरे अग, ए अग, आता थोडी ‘गोमुखी’ हो पाहूर तो बघ सुनासशेट येतोच आहे इकडे. त्याची आई टेकली आहे मरायला आणि ती संधि साधून मी मोठे किटाळ रचले आहे. त्याच्यावर पैसे छण् छण् मोजून घेतो. जा आत जा. (क्षारा जाते.)

सुनासशेट : (प्रवेशून) शाकंभट, बाबा आता काही ताईत बिईताचा दैवी उपाय तरी पहा रे! माझी आई, गड्या आजचा दिवस काही उलटत नाही. ती मला सोडून जाणार! तसे काही तिचे वाईट नाही. लोळा गोळा होऊन उतारवयी खितपत पडली होती तिची सुटकाच आहे. पण मला आई अंतरणार! (स्फुंदतो.)

शाकंभट : (एकदम गळा काढून) आणि मला पण अंतरणार! माझी पण ती आईच होती. शेटजी, नव्हे नव्हे, दादा, भाऊ शपथेवर सांगतो तू माझा सख्खा सावत्र भाऊ आहेस, आणि तुझी आई माझी सावत्र आई आहे! असा आ पसरून काय पाहतोस? दादा, तुझ्या, आपल्या, कुळाचे एक आजवर गुप्त राहिलेले रहस्य आज उघडकीस येणार तेव्हा माझ्याप्रमाणेच मी तुलाही मानतो याच

आश्चर्य वाटणार नाही! अरे भाऊ माझा आणि तुझा बाप एकच होता. तुझी ही सख्खी तीच माझी सावत्र आई अंतरणार ना ती मला आता. (रडतो.)

सुनासशेट : अरे काय म्हणतोस तरी काय! काय सावत्र काय; भाऊ काय! तुला वेड तर लागले नाही ना? शाकंभट, तू आमच्या घरचा पिढीजाद उपाध्याय म्हणून तुला मी क्षमा केली. नाही तर अशी बाष्फळ बडबड घरोबा झाला म्हणून अशी भलतीच लागट वाक्ये मी ऐकणार नाही.

शांकभट : मीही बोललो नसतो- पण दादा घरोबा नाही; आपले घरच एक आहे. हे पहा काय ते. माझ्या बाबांनी मरताना हा ताईत दिला मला आणि सांगितले सुनासशेटजीची आई मरू लागली म्हणजे त्या दिवशी हा ताईत उघड. त्यातील पत्र दोघे वाचा आणि तिला दोघेही पाणी द्या. तिच्या चितेवर हे पत्र जाळा. नाही तर माझा जीव भूत होऊन तुमच्या दोघांच्या घराभोवती घुटमळू लागेल! म्हणून आज ताईत फोडला, पत्र उघडले आणि रहस्य कळले! भाऊ. तुझा पहिला बाप वारला तेव्हा तुझी आई काशीला होती का? तो वारल्यानंतर तुझ्या वेळी प्रसूत झाली होती का?

सुनीसशेट : (रागाने) होती, बरे मग? सांग काय ते सांग एकदाच.

शांकभट : तर मग हे सगळे खरे आहे. तिथेच माझे वडील होते. तिच्या बरोबर उपाध्याय म्हणून. तिथे तुझ्या आईला त्यांच्यापासून मुलगा झाला. तो तू. तू माझा भाऊ जसा धर्मशील युधिष्ठिराचा दानशील कर्ण! म्हणून म्हणतो माझ्या बापाची नव्हे, नव्हे आपल्या बाबांची.

सुनासशेट : दात पाडून टाकीन!

शाकंभट : पाड दात. पण जोवर जीभ आहे तोवर भाऊ मी ही चिठ्ठी म्हातारीचे प्रेतयात्रेचे वेळी सर्वांसमक्ष वाचून, तिला पाणी देणार! माझ्या वडिलांच्या दोन इच्छा होत्या त्यांचेकडे तुझ्या घरचे जे पांच सहा हजार रुपये मी फेडावे म्हणजे ऋणातून ते मुक्त होऊन त्यांना गति मिळेल. आणि दुसरी ही इच्छा. या दोनपैकी निदान एक कोणची तरी मला फेडलीच पाहिजे. नाही तर त्यांचा जीव गुंतून भूत होऊन घोटाळत राहणार तुझ्या माझ्या भोवती! ऋण फिटले तर बरे, नाही तर मी जीव गेला तरी हे रहस्य प्रसिद्ध करण्यास सोडणार नाही. भाऊ, माझा सख्खा, सावत्र भाऊ तो!

सुनासशेट : (त्यास झिडकारतीत) हट्! (स्वगत) हे काय ह्याच किटाळ आहे की ह्याच्या बापाचे की माझ्या आईचे, खरेही असू शकेल? होती खरीच माझी आई ह्याच्या बापाच्या घरी तिकडे. भुतांच्या गोष्टी पण ऐकू येतातच. खरे असू शकेल. माझे डोके भडकत आहे! पण काही असले तरी उद्या कोणाच्या कानावर ही नुसती भुमका जरी गेली तरी लोक नाही तेच खरे म्हणतील, आईच्या प्रेतास अग्नि देणे कठीण पडेल; उभी जात बोंब मारून उठेल! (उघड) शाकंभट गाढवाच्या लेका-

शाकंभट : नकोरे भाऊ तुझ्या स्वतःच्या बापासच असे अपशब्द बोलू, कारण भाऊ ज्यांचा मी लेक त्यांचाच तूही लेक आहेस!

सुनासशेट : अरे हळू, हळू तरी बोल! अरे माझ्या आईचा लौकिक लोकात किती! तिला देवता मानतात आयाबाया. तिच्या मरणाचे वेळी तू अशी भलतीच गोष्ट बोलू नकोस. हे बघ, तुझ्या बापाकडे जे माझे येणे होते ते मी सोडून देतो. ही पावती लिहून देतो. म्हणजे तो ऋणमुक्त होऊन त्याच्या जीवास मुक्ति मिळेल. ही एक इच्छा पुरी झाली म्हणजे झाले ना? पण तुला देवाची शपथ आहे. ह्या उपर अधिक काही ब्र काढू नकोस माझ्या आईविषयी!

शाकंभट : अरे माझी आई म्हण भाऊ. मी तिची निंदा का करू? तुझे कूळ ते माझे कूळ. तूच माझे कूळ झालास आता! मग पुन्हा तेच!

सुनासशेट : तो वाह्यातपणा सोड म्हंटले ना!

शाकंभट : बरे बुवा नाही बोलत. बाबांची एक कोणची तरी इच्छा पुरली. झाले. नाही तर भुतांची भीति रे! दे ती ऋणफेडीची पावती!

सुनासशेट : लिहून दे तू पण की पुन्हा ब्र काढणार नाही.

शाकंभट : अर्थात्, पण तुम्हीही त्याची प्रत लिहून द्या. आत या.

सुनासशेट : ती व्यवहाराची रीतच आहे. चल! (स्वगत) हे मी काय करीत आहे? पण उपाय नाही! असो, एकदा आईचा प्रेतविधी आणि और्ध्वदेहिक संपले की पाहून घेईन ह्या गावकुटाळाला कुठे तरी!

प्रवेश ५ वा

(बुद्ध भिक्षा मागत चालले आहेत. नागरिक उभे आहेत-तितक्यात शुद्धोदन महाराज येतात.)

शुद्धोदन : कुठे आहे तो सिद्धार्थ? राजकुलाला कलंक लावणारा तो भिकारी कुठे आहे?

सिद्धार्थ : हा इथे आहे महाराज! पूर्वी आपणांस दुःख देण्यास कारणीभूत झालेला आणि आता आपल्या कुळास कलंक लावण्यास कारणीभूत होणारा हा सिद्धार्थ वडिलांचे अभिवादन करीत इथे हा उभा आहे.

शुद्धोदन : बाळा, सिद्धार्था, माझ्या तनया, तुला असा सकुशल परत आपल्या राजधानीत आलेला पाहून माझ्या हृदयात उचंबळून येणाऱ्या आनंदसागरात तुझ्या ह्या भिक्षावृत्तीच्या विक्षिप्तपणाचा सारा राग बुडून विरून गेला! अहो, माझा पुत्र किती विनयशील आहे? महंत पदवीला चढलेला आणि राजामहाराजांचा आचार्य झाला असताही आपला पुत्रधर्म विसरला नाही. त्या दूताने मला काहीचे बाहीच सांगितले म्हणून मी उगाच रागावलो, तू भिक्षुधर्माप्रमाणे राजधानीत भिक्षा मागत आडवाटेने शिरलास इतकेच ना?

दूत : (स्वगत) मग मी तरी ह्याहून अधिक काय सांगितले बुवा! पण चूक रागावणाऱ्या बापाची नाही; विनयशील पुत्राची नाही; चूक काय ती दूताची! दूत म्हणजे दोन्ही बाजूने थपडा खाणारा मृदंग!

शुद्धोदन : प्रिय तनया, तू मला भेटलास- यात मागचा सर्व दुःखशोक मी विसरून गेलो पण बाळा, सिद्धार्था, तू मला आणि राज्याला सोडून जेव्हा तपस्येस गेलास तेव्हापासून आज नऊदहा वर्षे मी ह्या राज्याचा भार ज्या दिवसाच्या आशेने वाहिला तो दिवस आज उजाडला. हा तुझ्या वृद्ध पित्याचा तो हा राज्यभार, हे विनयशील तनया, आता तू आपल्या समर्थ मस्तकावर धारण करून मला निश्चिंत करावे, शाक्यांच्या राज्याचा हा रत्नजडित मुकुट, हे युवराजा, मी आज तुझ्या मस्तकावर घालीत आहे. तरुण राजपुत्रा हा मुकुट तुला शोभतो आणि मुंडन ह्या मला वृद्धाला शोभते; तर तुझ्या भर तारुण्यात धारण केलेल्या मुंडनाने आणि माझ्या भर वार्धक्यात धारण केलेल्या मुकुटाने झालेल्या अशास्त्र व्यत्यासाच्या कलंकापासून आपले हे राजकुल आज मुक्त कर. घे हा मुकुट आणि दे तो कमंडलू इकडे.

सिद्धार्थ : थांबा, महाराज, जर मस्तकावर दुसरा कोणचा भार मी धारण केला नसता तर क्वचित् हा ह्या मुकुटाचा भार मी वाहिला असता. पण मला वाटते तरीही तो वाहिला नसताच. कारण लहानपणापासून जेव्हा जेव्हा दरिद्री आणि कष्टाळू शेतकऱ्यांस घामाने चिंब झालेले मी पाही आणि राजाच्या धनाशेसाठी युद्धात घायाळ झालेल्या सैनिकांस रक्ताने न्हालेले पाही तेव्हा तेव्हा मला ह्या राजमुकुटाची शिसारी येई. वाटे या मुकुटातील प्रत्येक ऐदी पाचपाचू त्या शेतकऱ्यांच्या आणि श्रमकऱ्यांच्या यातनेच्या घामाचेच थेंब आहेत, आणि या मुकुटातील प्रत्येक आधाशी लाल आणि रत्न त्या सैनिकांच्या रक्ताचे थेंब आहेत. राजांची तृष्णा ही एखाद्या राक्षसीसारखी ह्या कष्टाळू श्रमिकांच्या रक्तास पीत असते. आणि हा मुकुट त्या राक्षसी राजपिपासेच्या हातातील ते

रक्त पिण्याचा पेला असतो. हे मुकुटा! तुझ्यातील रत्नांच्या संख्ये इतक्याच निर्मल पाण्याच्या थेंबांनी भरलेला कमंडलू आणि धान्याच्या दाण्यांनी भरलेली ओंजळ तुझ्याहून अधिक उपयुक्त आहे. कारण ती हीनदीन तहानलेल्याला पिता येईल, भुकेला खाता येईल. पण ज्यांना पिता येत नाही, खाता येत नाही, त्या अत्यंत निरुपयोगी चमकदार गारगोट्यांनो, जा! रत्ने म्हणून मूर्ख माणसांनी तुम्हांस ज्या उकिरड्यावरून गोळा केले त्यावर पडा जा! (मुकुटास फेकून देऊ पहातो तोच राजसेवक तो वरचेवर झेलतात.)

(चाल-सकल गड चंदा कलासन)

तुजहुनि मुकुटा कमंडलु बरा । तू अमोल । कवडि मोल जरि हा ।। ध्रु.।।

छत्रे तव तापा । अधिक देऊन ।

सुकविले जीव तू । सुखवि सुजले हा ।। १ ।।

महाराज, ह्या मुकुटाचा भार मस्तकावरून दूर केल्यावाचून जगाच्या कल्याणाचा भार वहाण्यास त्यावर कुठची जागा सापडणार?

शुद्धोदन : पण सिद्धार्था! अरे, तू ज्या क्षत्रिय कुळात उत्पन्न झालास त्याचे मुकुट धारण हेच कर्तव्य होय. निदान अशी भिक्षावृत्ति तरी आचरू नकोस. तो आपल्या कुळाचा धर्म नव्हे.

सिद्धार्थ : महाराज, आपल्या कुळाचा तो धर्म नसेल पण माझ्या कुळाचा धर्म आहे.

शुद्धोदन : अरे, सिद्धार्था, ज्या ह्या तुझ्या शाक्य कुळात महासामंत म्हणून गाजलेले बावीस पूर्वज, बावीस मुकुटाधीश पिढ्या होऊन गेल्या त्यात एकही भिक्षा मागणारा झाला नाही. तेव्हा तुझ्या कुळाचा भिक्षा हाच धर्म आहे हे तू म्हणतोस तरी कसे?

सिद्धार्थ : कारण, महाराज, तुम्ही सांगता ती गोष्ट सिद्धार्थ गौतमाच्या कुलाची आहे. पण मी तथागत आता सिद्धार्थ गौतम नसून बुद्ध आहे. आणि माझ्या बुद्ध कुलात जे पूर्व बुद्ध होऊन गेले ते सर्व ह्याच भिक्षावृत्तीचे अवलंबन करीत आले.

शुद्धोदन : पण भिक्षा जरी मागावयाची तरी प्रत्यक्ष राजवाड्यात ह्या तुझ्या सर्व शिष्यसंघाची भिक्षेची व्यवस्था केलेली असता प्रथम तिकडे यावयाचे की या अस्पृश्यांच्या गल्ल्याकुंच्यांतून तुकडे वेचीत हिडावयाचे?

सिद्धार्थ : महाराज, समजा, एखाद्या वैद्यापाशी एखाद्या रोगावर उत्कृष्ट औषध आहे तर त्याने प्रथम कोणाच्या घरी जावे? जो निरोग आहे, धष्टपुष्ट आहे त्याच्या किंवा जो त्या रोगाने अगदी आर्त झाला असेल त्याच्या?

शुद्धोदन : अर्थात् जो त्या रोगाने अगदी आर्त झाला असेल त्याच्या!

सिद्धार्थ : तर मग महाराज, मी त्या राजवाड्यात प्रथम न येता ह्या दीन अस्पृश्यांकडेच प्रथम गेलो हेच उचित केले. महान् साधनेने अंती मनुष्यमात्राचे परम दुःख दूर करण्याची परम औषधि मला सापडली आहे आणि मनुष्यामात्रातील हे अस्पृश्य परम दुःखी आहेत! खायला नाही, प्यायला नाही, रहायला नाही, अहो प्रेमाने त्यांच्या पाठीवरून हात फिरवून समाधान करण्यासाठी त्यांस

कोणी उरलेले नाही! गावातील कुत्र्याच्या पाठीवरून प्रेमाने हात फिरवताना मी हजारो चार्तुवर्णीयांस, पाहिले आहे. कुत्र्यांची पाळीव पिल्ले हातात उचलुन त्याचे कौतुक करताना मी त्रैवर्णिकांस पाहिले आहे. पण ह्या दीनहीन अस्पृश्यांची सोन्यासारखी मुले, कुत्र्याच्या मोलानेही त्यांस कोणी विचारीत नाहीत! त्यांच्या सावलीचा विटाळ! अशा या दुःखी प्राण्यांसारखे दुसरे कोणी दुःखी मला मनुष्यजातीत दिसले नाही, म्हणून मी प्रथमतः त्या अत्यंत दुःखार्तांचे दुःख हरण करून त्यांसही मोक्षसुखाचा आस्वाद कसा घेता येईल याचा उपाय सांगण्यास गेलो! ह्यात अनुचित ते काय झाले महाराज!

शुद्धोदन : तुझे हे विचार अत्यंत उदार आहेत ह्यात शंका नाही. पण त्या लोकाचे भिक्षान्न स्वीकारणे तरी अनुचित नाही का? त्यांचे अशुद्ध

सिद्धार्थ : अशुद्धाविषयीच विचाराल तर मग महाराज ह्या अस्पृश्यांच्या अंगातील अशुद्ध अगदी आम्हां ब्राह्मणक्षत्रियांच्या अशुद्धा इतकेच आरक्त, शुद्ध वा अशुद्ध असते! हेच रक्त, हाच वर्ण, रंग, रूप, गुण सर्व अगदी मनुष्यासारखी मनुष्ये आहेत महाराज ती! धुतले म्हणजे त्यांचेही हात साफ होतात. असेच तांदूळ अशाच पाण्याने धुवून, अशाच हाताने, अशाच अग्नीवर त्यांनी ठेवले असता असाच तुमच्या भातासारखा शुद्ध भात अस्पृश्यांच्या घरीही शिजतो. तसाच शुद्ध भात शुद्ध भावनेने त्यांनी घातला- मी घेतला. मी नुसत्या त्यांच्या पाठीवर प्रेमाने हात फिरविण्याने जर त्या दीन जीवांस स्वर्गतुल्य आनंद होत आहे; तर तेवढा हात फिरविण्याचे औदार्य म्या न दाखविणे म्हणजे माणुसकीस मुकणेच नाही काय? महाराज, वर्णाहंकारांनी माणूसच माणसाचा भयंकर शत्रु झालेला आहे. म्हणून तथागत बुद्ध केवळ गुणावरून, शीलावरून माणसांची योग्यता ठरवतो; जन्मावरून नाही. जन्मजात ब्राह्मण क्षत्रियातही त्याला पतित आढळतात आणि जन्मजात पतित अस्पृश्यांतही त्याला ब्राह्मणक्षत्रिय आढळतात. बुद्धाने जी अमृताची पाणपोयी घातली आहे तीवर प्रत्येक तान्हेल्या जीवास जीवनाचे पाणी पिता येते. तेथे वर्णाहंकाराचा विटाळ मानिला जात नाही.

(चाल-बहार आयी रे.)

वर्षा ऋतु आला रे । भूत दया- घन द्रवला । तप्त लोक धाला ।। ध्रु.।।<br>
ये द्विज चंडाला । जो तो तपला ।<br>
पात्र तव तैसे ने । जीवन । जाति नचि दयेला ।। १ ।।

शुद्धोदन : तू खरोखरीच कोणी अलौकिक आत्मा आहेस! धन्य माझा वंश की तू माझ्या पोटी आलास! सिद्धार्थ, बुद्धा आता शिष्यांसह एकदा तरी माझ्या राजवाड्यात आपण भिक्षेस यावे. तसेच एकदा तरी त्या माझ्या सुशील सुनेस, तुझ्या विरही पत्नीस, देवी यशोधरेसही भेट द्यावी.

सिद्धार्थ : जशी महाराजांची इच्छा! (बुद्ध चालू लागतात. सर्व शिष्य, ''बुद्धं शरणे गच्छामि, धर्मं शरणे गच्छामि, संघं शरणे गच्छामि'' असे म्हणत त्याच्या मागे जातात.)

प्रवेश ६ वा

(सुनासशेटजीचे घर)

सुनासशेटजी : आई!आई! तू मला शेवटी सोडून गेलीसच ना! (रडतो.)

बायका : (एकेकी एकेक वाक्य) नका रडू शेटजी! तिचे काही वाईट झाले नाही, मुले, नातू, सुना-भाग्याची होती बिचारी, जगाची रहाटीच आहे. नका रडू! तुम्ही रडले की, आम्हांलाही रडू येते. ही पोरबाळंही रडू लागतात.

(सर्व रडतात.)

सुनासशेट : तिचे म्हातारपणी बरेच झाले. पण मला आता आई उरली नाही. आईच्यासारखी मला आता समाधानाची जागा कुठे मिळणार!

बायका : (एकेकी एकेक वाक्य) ते का शेटजी? आम्ही आहोतना चार संबंधी शेजारी! आम्ही आईच्या ठिकाणी आहोत बरे. आम्ही तुम्हांला आई गेली असे नाही वाटू देणार. नका रडू शेटजी (रडतात.)

शाकंभट : (प्रवेशून स्वगत) हं. हं. अगदी वेळेवर आलो. ह्याने आपल्या हाताने काल मला ही चिठ्ठी लिहून दिल्यामुळे हा आता माझ्या पक्केपणी पेचात आला आहे. काय म्हणते ही चिठ्ठी. 'शाकंभट यांस, तुम्ही माझ्या आईविषयीची आणि तुमच्या बापाविषयीच्या रहस्याचा बोभाटा कुठेही करू नये आणि मी तुम्हांकडे असलेले येणे स्वेच्छेने घरोबा म्हणून सोडून द्यावे असे जे तुमचे आमचे बोलणे ठरले त्याप्रमाणे ही पावती देत आहे की, मी माझे तुमच्याकडच्या येण्याचे सर्व पैसे भरून पावलो.' तो गेला लेखी पावतीत गुंतवायला मला! वाण्याचा स्वभाव काही व्यवहार झाला की, 'लेखी' म्हणून म्हणण्याचार तसा तो चटकन् बोलून गेला आणि फसला! अति शहाणा त्याचा बैल रिकामा! पुढे होऊन हाय, हाय! भाऊ, आई गेली न शेवटी आपली! माझी सख्खी आई मेली तर मेली, आता ही सावत्रही गेली! अरे माझ्या म्हणजेच तुझ्या वडिलांचे तिच्यावर केवढे प्रेम!

सुनासशेट : (दचकून उठतो. स्वगत) हा चांडाळ पुन्हा घोटाळा करतो की काय काही! (उघड) उगे भटजीबुवा! नका रडू जाऊ द्या ते उगे

(त्याचे तोंडावर हात ठेवतो.)

शाकंभट : नका रडू कसे? रड सांगून का येत. ती माझी सख्खी सावत्र आई ना! तू माझा सख्खा सावत्र भाऊ, जो माझा बाप (शेटजी तोंडावर हात ठेवून तोंड दाबतो) तोच- भाऊ - तुझा-

सर्व लोक : हे काय भटजीबुवा? शोक झाला म्हणून असे अर्वाच्य बकायचे की काय? काही जातपातीचा विचार! नाटक आहे की काय हे भलतेच बकायला?

शाकंभट : तुमच्या शोकाचे नाटक आहे. तुमची जात मानलेली, पण माझी जात तीच ह्या माझ्या भावाची खरी जात हो! आता बोलतोच सगळं.

(शेटजी तोंड दाबतो.)

सुनासशेट : अहो गृहस्थ हो, हा ब्राह्मण आमचा कुलपरंपरागत उपाध्याय, घरीच वाढलेला. तिच्या मुलासारखा होता. शोकाने वेडावला आहे. त्याचेकडे काय लक्ष देता. जा, प्रेतविधीची सिद्धता करा. चला बायांनो घरात, मामा काका जा बाजारात. सामान जुळवा. आता नुसत रडून काय होतं जा! (सर्व जातात.)

शाकंभट : अहो, मी खांदा देणार माझ्या आईला. माझ्या बापाचे हे पत्र; ह्या माझ्या भावाचे हे पत्र!

सुनासशेट : भटुरड्या. आता जर तू आणखी पैसे उपटू पाहशील तर तुला राजपुरुषाच्याच हातात सोपवून देईन! काल काय ठरले?

शाकंभट : ही चिठ्ठी ठरली. ह्यात तू स्वतः लिहून दिल आहेस की, तुझ्या आईविषयी असे काही रहस्य आहेर नि ते मी फोडू नये. ही चिठ्ठी मी ह्या लोकासमक्ष वाचणार! तूच ना त्या सारथी बाणाचा हवाला घेऊन मला बुडवलेस (मोठ्याने) भाऊ तो माझा सख्खा सावत्र

सुनासशेट : फास लावलास रे चंडाळार अरे चूप! निदान चूप बसायला काय घेशील ते सांग तरी एकदाचा.

शाकंभट : एक हजार अक्षरी एक हजार! (मोठ्याने) आई ग काशीला असता तुझा भ्रतार वारला तेव्हा माझ्या वडिला..

सुनासशेट : अरे चुप. काय करावे! कुठून चिठ्ठी दिली ह्या चंडाळाला ती! अरे शाकंभट माझ्या जातीच्या मनात विकल्प आणून माझ्या आईच प्रेत दारात पाडून ठेवू नकोस रे! काही माणुसकी धर! आता हजार कुठून आणू! आता सर्व विसर; ही सलकडी घे नि ती चिठ्ठी दे. लोक येऊ लागले, ह दे ती चिठ्ठी चंडाळ लवकर दे, घे सलकडी घे , घे न, दे न!

शाकंभट : (हसत) कशी बळंबळे सलकडी माझ्या हातात घालतो आहे! पण! माझा भाऊच सख्खा सावत्र तो(वस्तु विनिमय करतात.)

सुनासशेट : (चिठ्ठी हातात पडताच पाहून) जा, जा, आता क्षणभर उभा राहू नकोस!

शाकंभट : अरे नुसता उभा राहतो रे शेट! रडत नाही, हसत उभा राहतो. नुसता उभा.

सुनासशेट : नुसता नाही नि फोडणीचा नाही. चालता हो, जा! (शाकंभट हसत जातो,) नीच! गावगुंड!! एवढ आईचे और्ध्वदेहिक संपले की पाहून घेईन याला पण!

प्रवेस ७ वा

(बुद्ध, शिष्य आणि सेनापति विक्रम बसले आहेत.)

बुद्ध : सेनापति विक्रमदेव, आपण या शाक्य राष्ट्राचे सेनानी आहा. आपण या शाक्य राष्ट्रातील एक महान् ज्ञानीही आहात, आपण पूर्ववयात यज्ञ- दान- तपांची साधना आचरीत तत्वज्ञानाची गूढतत्वे योगयुक्त चित्ताने चिंतून सिद्धत्व पावलेले आहात हेही मी जाणून आहे. म्हणूनच या

उभ्या शाक्यजातीत विशेषतः आपल्यालाच मला सापडलेल्या आर्य सत्यांचा ठेवा दाखवावा आणि मी जे हे महान् धर्मचक्र प्रवर्तन केलेले आहे त्याची गति आध्रुवध्रुवापर्यंत पोचवून सकल लोकास दुःखमुक्त करण्याचे कार्यी आपले सहकार्य संपादन करावे हा माझा या कपिलावस्तूस परत येण्यामागे एक मुख्य उद्देश आहे. तेव्हा आपण संन्यासाची दीक्षा घेऊन या भिक्षुसंघात समाविष्ट व्हावे अशी माझी इच्छा आहे. अहो, हा संसार स्वर्गसुद्धा तृष्णेच्या आगीत जळत आहे. ज्ञान्याने त्यांचा वमनवत् त्यागच केला पाहिजे. वणव्यातून सुटलेला प्राणी जसा पुन्हा वणव्यात शिरत नाही, रोग बरा झाला असता कोणीही ती पीडा पुन्हा व्हावी असे इच्छीत नाही त्याप्रमाणेच ज्ञानी ह्या संसारात पुन्हा रमत नाही. असे असता आपणासारखे सिद्धही ह्या संसारात, त्यातही घातपाताने दूषित अशा ह्या सैनिकव्यवसायात कसे राहू शकतात हे मला समजत नाही.
विक्रम : कसे? भगवान्, जसे जन्म, व्याधि, जरा नि मृत्यु या दुःखांनी पीडिलेल्या ह्या देहात आपण, त्या दुःखांचा अन्त करणारे, निर्वाण प्राप्त झाल्यावरही राहू शकता तसे! मी तथागतास विचारतो की, निर्वाणप्राप्तीनंतर, त्या ज्ञानासहच, तृष्णेच्या निवृत्तिसहच, हा भौतिक देह तत्काळ विरून, बिलगून, वितळून मृगजळासारखा नाहीसा होतो काय? नसेल तर त्याचा बळाने नाश करून, आत्महत्या करून, देहाची बेडी तत्काळ तोडून टाकणे इष्ट आहे काय? नसेल तर देहधारणा मुक्तांनाही बुद्धांनाही केलेच पाहिजे नाही का? विदेहमुक्ती म्हंटली तरी भौतिकतः ती मरणापर्यंत सदेहच जर असणारी आहे तर मग देहधारणाची सांसारिक कर्मे करावीच लागणार ना? त्यातही आपणांसारखे महात्मे तर मुक्तानंद भोगीत एखाद्या गेंड्यासारखे रानांत एकटेच भटकत न फिरता दुःखितांच्या दुःखाने द्रवून लोकास चिरंतन सुखाचा लाभ करून देण्यासाठी हा उपदेशाचा, प्रचाराचा, शिष्य संघाचा, वादविवादाचा, मठांचा आणि मठपतित्वाचा मोठा प्रपंच मांडीत असतात? तो का?
बुद्ध : सेनापते, निर्वाणप्राप्तीनंतर देह तत्काल नाहीसा होत नाही हे खरे तर मग आपण विचारता की, 'निर्वाणप्राप्तीनंतर बळाने देहत्याग करणे इष्ट आहे काय? त्यास तथागताचे स्पष्ट उत्तर आहे बळाने देहत्याग करणे हे एक नवीनच कर्म असल्याने ते पुनर्जन्मास कारणीभूत होणारे आहे आणि जन्ममृत्युच्या पार होणे हे तर तथागताचे ध्येय आहे. म्हणून तथागताने देहत्याग केला नाही. मागील कर्मांची ती देहगति आपण होऊन थांबेल तेव्हा थांबेल! देहनाश तर दूरच, पण देहच्छलही तथागतास संमत नाही. मध्यम पंथ हाच सुवर्णपंथ आहे. देहाला निरोगी आणि कार्यक्षम राखून लोककल्याणार्थ सदोदित त्यास परोपकारी झिजविणे हेच खरे दैहिक तप. दया हीच मुक्ताची दयिता आणि दुःखतप्तजनावर त्या दयेने प्रेरित होऊन निर्वाणामृताचे शीतल सिंचन सदोदित करीत राहणे हाच संन्याशाचा संसार!
विक्रम : तर मग संन्याशांनाही संसार असतोच! मुक्त होताच देहनाश न करण्याचे कारण म्हणून जो आपण पुनर्जन्म, कर्म, कर्मफल आदिक पारलौकिक सिद्धान्तांचा उल्लेख केलात त्याविषयीची चर्चा मी माझ्या प्रस्तुत उद्देशास अप्रस्तुत म्हणून सोडून देतो. आणि ज्यास स्वतः निर्वाणपद

प्राप्त झाले आहे, आत्मप्रतीति आणि आत्मप्रसाद लाभतो त्यांसही तत्काल देहनाश करणे अनिष्ट वाटते असल्यामुळे देहयात्रा करताना देहधारणाचा किंवा आपल्यासारखे महात्मे मांडतात तशा परोपकारप्रेरित संन्याशाच्या संसाराचा ह्या जगांतील जो व्यवहार करावा लागतो त्याच्या ऐहिक हेतूंची आणि स्वरूपाची आणि परिणामांची तेवढीच चर्चा मी करू इच्छितो. मी तथागतांना विचारतो; की, मठामध्ये राहून मुक्त जे अशनवसन शयनादिक व्यवहार करतो त्यात आणि गृहामध्ये राहून बद्ध जे व्यवहार करतात त्यात पहिला मठस्थ अनासक्तपणे, प्राप्तनिर्वाहार्थ किंवा निरहंकारी परोपकारार्थ ते व्यवहार करतो आणि दुसरा गृहस्थ तसे करीत नाही हाच ना आपल्या मते मुख्य भेद?

बुद्ध : होय.

विक्रम : तर मग अशा अनासक्त बुद्धीने परोपकारार्थ गृहामध्येही जर कोणी, ज्ञानी, सिद्ध, ते व्यवहार, ही ऐहिक यात्रा पार पाडू लागला तर मग अशा मठस्थांत आणि तशा गृहस्थांत विदेह स्थितीचे दृष्टिने काही आक्षेपार्ह भेद असू शकणार नाही, नाही का?

बुद्ध : गृहामध्येही मठाप्रमाणेच विदेहमुक्ताचा व्यवहार चालू शकेल हे मला मान्य आहे. मठामध्येही प्रलोभने असतातच! परंतु तरीही गृहामध्ये ती अधिक असणार हे उघड आहे.

विक्रम : पण ती भीति साधकांना लागू आहे. मुक्तांना, सिद्धांना नाही. कारण प्रलोभनांचे ज्यास अजून भय आहे त्यास आपण साधकच म्हणतो, सिद्ध नव्हे. आता ज्या अर्थी मुक्त हा परोपकारासाठीच, दुःखितांच्या दयेसाठीच हा धर्मप्रसाराचा आणि लोकसेवेचा व्याप उभारतो त्याअर्थी तो ऐहिक परोपकार सर्वांस सरसहा संन्यासदीक्षाच देऊन साधतो की, मठस्थच होऊन की गृहस्थच राहून हा मुख्य प्रश्न मला आपणांपासून सोडवून घ्यावयाचा आहे. विदेह्याच्या संन्यासाश्रमात आणि विदेह्याच्या गृहस्थाश्रमात, किंवा थोडक्यात म्हणजे गार्हस्थ्यात आणि संन्यासांत मुख्य भेद म्हणजे हाच ना की, संन्यासाश्रमात कामिनी, कृषि आणि कृपाण यांचा बहुधा आत्यंतिक त्याग करावा लागतो आणि गृहस्थाश्रमात तो लागते नाही? कृषीने भरणेपोषणाचे धंदे, कामिनीने संतानोत्पत्ति आणि कृपाणाने प्रसंगी शस्त्रयुद्धात भाग घेणे हीच उल्लेखित आहेत.

बुद्ध : एकंदरित आपण म्हणता त्या अर्थी संन्याशाला कामिनी- कृषि - कृपाण ह्यांचा आत्यंतिक त्याग करण्याची प्रतिज्ञा करावी लागते, तोच दोन्ही आश्रमांतील मुख्य व्यावहारिक भेद आहे खरा.

विक्रम : तर मग हे तथागत, मी असे स्पष्टपणे म्हणतो की, परोपकाराचे कार्य मुक्तांसही संन्यासाश्रमाहून गृहस्थाश्रमाचाच अवलंब केल्याने अधिक प्रमाणात करता येतील. इतकेच नव्हे तर जो जो भिक्षु होऊ इच्छील त्याची त्याची, पात्रापात्रतेचा लवलेश विचार न करता आपल्या संन्यस्त भिक्षुसंघात आपण जी भरती करीत आहा तीमुळे उपकाराचे परिवर्तनात मोठाच अपकार होणार आहे! काल आपण प्रत्यक्ष राहुलास आपल्या आठ नऊ वर्षांच्या मुलासही भिक्षुसंघात समाविष्ट करून घेतलेत! आता ज्या कोवळ्या मुलांस संसार काय आणि संन्यास काय ह्याची

कल्पनाही नाही अशा मुलासुद्धा सरसहा सर्वांस संन्यस्त भिक्षुसंघात ओढल्याने केवढा अनर्थ ओढवणार आहे पहा! ह्या शाक्य राष्ट्राचेच प्रकरण उदाहरण म्हणून मी घेतो. आपण संन्यस्त झालात, आपण राजपुत्र आनंद आणि देवदत्तालाही संन्यास दीक्षा दिलीत, शेवटी राजतनय राहुल, ते आठ वर्षांचे मूलही भिक्षु संघात घेऊन शाक्यांच्या आसन्नमरण राजवंशाच्या लतेची ही शेवटची कलिकाही खुडून टाकतील. सामंतकुळांसुद्धा सर्व उत्तम पुरुष संन्यस्त झाल्याने ह्या राष्ट्रात सद्‌गुणी आणि अभिजात बीजापासूनच होणारी उत्तम संतति खुटली. दुर्गुणी आणि अपकृष्ट लोकाची संतति तेवढी वाढत राहिली. अशा स्थितीत उत्तम बीज तेवढे निवडून फेकून देऊन किडकी सडकी निकृष्ट बीजेच तेवढी पेरणाऱ्या शेतकऱ्याच्या पिकाची जी दुर्दशा होणार तीच ह्या शाक्य जातीची होणार! संन्यासधर्माच्या, कामिनीत्यागाच्या- निस्संतानतेच्या पहिल्या प्रतिज्ञेने असा लोकक्षय आणि सुप्रजननक्षय होत असताच आपला प्रचार जर असाच चालला तर हे शेकडो लोक आपापले नांगर तोडून, माग मोडून, दुकाने सोडून दुसऱ्यांच्या मेहनतीवर जागणाऱ्या भिक्षुसंघातील भिकाऱ्यांची संख्या फुगवीत राहणार! कारण कृषित्याग ही संन्यासधर्माची दुसरी प्रतिज्ञा पडली! दुसऱ्याने मरेपर्यंत शेती करावी. ते अन्न आयते भक्षिणे हे संन्यासधर्मात पाप नाही. पण शेती करणे हे मात्र पाप कारण नांगराने अनेक जीव मरतात म्हणून शेती हिंसाप्रधान! संन्यासी स्वतः अशी पापमय शेती करणार नाही- पण दुसऱ्याकडून ते पाप आचरवून ते पापांचे अन्न मात्र खाण्यास सोडणार नाही! यापेक्षा संन्यासी स्वतः शेती करून ते अन्न खाते तर ते पाप या ढोंगीपणाहून खचित कमी होते!

बुद्ध : सेनानी विक्रम, पण माझ्यासारखे संन्यासी हे एक प्रकारचे शेतकरीच आहेत. नाहीत काय? हे पहा, या भवभ्रमाचे रान साफ करून चित्ताचे शेत मी ज्ञानाच्या नांगराने नांगरून काढतो. नीतिनियम हा माझ्या नांगराचा दांडा होय, उद्‌यमशीलता हा त्याचा बैल आहे, सद्धर्म मतांच्या बीजास मी पेरतो, सत्कर्मरूपी दृष्टीने ते सिचिले जाते आणि नंतर त्यास सर्व दुःखाचा अंत करणारे शाश्वत जीवनाचे पीक लगडते!

विक्रम : परंतु महाराज, आपल्यासारखे असे, सामाजिंक सदाचारांच्या परम शुभास्पद उपदेशाच्या अमृतफलाची लागवड करणारे लाक्षणिक शेतकरी तरी या आपल्या संन्यासी संघात कितीसे आहेत? ह्या उभ्या जगतात किती आहेत? एक, दोन, फार तर तीन. परंतु या एकट्यार दुकट्या खऱ्या शेतकऱ्याच्या पीतपटाचे ध्वजाखाली हे जे शेकडो निरुद्‌योग संन्यासी, भिक्षु बैरागी इत्यादि लोकाचे बागारबुणगे जमलेले असतात त्यांच्या श्रमास आंचवल्याने राष्ट्राची आर्थिक शक्ति किती हीन होऊन जाते ती पहा! जो जो एकेक मनुष्य संसार सोडून संन्यासी किंवा श्रमण होतो त्याचे मागे दोघा जणांच्या उपार्जनास समाज अंतरतो. एक त्या संन्यस्त श्रमणाच्या आणि दुसऱ्या श्रमणास पोसणाऱ्या श्रमिकाच्या प्रत्येक श्रमण म्हणजे समाजातील प्रत्येक उपयुक्त धंद्‌यावर एक मूर्तिमंत करच! हा आपला संघच घ्या! आठ वर्षांच्या अवधीत त्यात सहस्त्रावधि माणसे शिरली. सहस्त्र वर्षे हे गाडे जर असेच चालले तर ती संख्या लाखांनी मोजावी लागेल! बरे, ह्या

संन्याशांच्या संसारास लागते नाही काय? गृहस्थाप्रमाणे दुकुल वसने नसली तरी वस्त्रे हवीत, विलासभवने नसली तरी विहारभवने हवीत, मंदिरे नसली तरी मठ हवेक, मोदक नसले तरी मीठ भाकर हवीच, त्यांस पादुका हव्यात, पांघरुणे हवीत, वैद्य हवेत, औषधे हवीत, भांडी हवीत, भांडणे देखील हवीत! आपल्या संघातीलच पक्षविपक्षांच्या भांडणावरून स्वतः तथागतासही नाही का अनेक वेळा संघ मोडून टाकण्याचा धाक या उद्दंड भिक्षूंस घालावा लागला? भगवन्, ज्या घरात एक भाऊ मिळवता असून चार भाऊ नुसते खाऊ बनून भटकत फिरतात ते घर जसे डबघाईस आल्यावाचून राहणार नाही तसाच लाखो लोकाच्या धनोत्पादानास अंतरलेला आणि त्यांच्या भरणाच्या भाराखाली पिढ्यानंपिढ्या त्रासून गेलेला समाजही डबघाईस आल्यावाचून राहणार नाही. कृषीच्या अर्थोत्पादक व्यवसायाच्या त्यागाची संन्यासाश्रमाची जी दुसरी प्रतिज्ञा असते तिचा असा भयंकर परिणाम होऊन लोकाच्या कल्याणापेक्षा लोकाचे अकल्याणच होत राहील.

बुद्ध : परंतु सेनानी, भौतिक धन हेच काही खरे धन नाही. ऐहिक उन्नति हाच काही मनुष्याचा पुरुषार्थ नाही. पारलौकिक उन्नति हाच खरा पुरुषार्थ आहे, हे मूळ विधेयचे आपण विसरता!

विक्रम : छेः! छेः! ते आपण प्रथमच मान्य केले आहात की, निर्वाणप्राप्तीनंतर किंवा निर्वाणप्राप्त्यर्थ जे धर्माचरण अत्यावश्यक आहे ते गृहस्थाश्रमातही साधता येईल. ह्यास्तव पारलौकिक हित हा उभयपक्षी समान असणारा घटक सोडून उरलेल्या ऐहिक लाभालाभाचीच तुलना कर्तव्य आहे. किबहुना संन्याशाच्या संसारासाठी देखील गृहस्थाचा संसार अवश्य आहे. हा भात पिकवील तरच तो अल्लक म्हणून भिक्षा मागून खाईल! अनासक्त बुद्धि असेल तर भीक मागण्यात वेळ घालविणे काय किंवा शेती करण्यात वेळ घालविणे काय, सारखेच बंधनकारक आहे अथवा नाही! म्हणून मी म्हणतो की, आपणासारखे मुक्त देखील संन्यायाश्रमी विकृत प्रतिज्ञांच्या बेड्या अडकावून न घेता जर गार्हस्थाच्या प्रकृत परंपरेनेच लोकोपकारार्थ जीवन यापन करतील तर अधिक लोककल्याण साधू शकतील. परंतु भगवंतासारख्या लोकोत्तर विभूतीचा प्रश्न जरी सोडून दिला, तरी तदितर सर्व जनांना तरी संन्यासाश्रमाचा प्रवेश सर्वथैव निषिद्धच असला पाहिजे. कारण कामिनी आणि कृषि ह्यांच्या आत्यंतिक त्यागाच्या ज्या दोन प्रतिज्ञा संन्याशाला घ्याव्या लागतात त्यामुळे राष्ट्राचा प्रजाक्षय आणि धनक्षय होऊन त्या राष्ट्रास उलट कसा अपकार होतो हे मी जे आता दाखविले त्याहूनही भयंकर हानि ह्या समाजाची, ह्या राष्ट्राची, संन्यासाच्या त्या तिसऱ्या प्रतिज्ञेने कृपाणाच्या त्यागाने त्या आत्यंतिक अहिंसेच्या बुद्धिभ्रष्ट ब्रीदाने होत आहे, होणारी आहे! भगवन् ही आत्यंतिक अहिंसा नसून हा आत्यंतिक आत्मनाश होय! आणि आत्म्याचा नाश हीही पुन्हा हिंसाच होत असल्याने आत्यंतिक अहिंसा म्हणजे आत्यंतिक हिंसा! असे अहिंसेच्या ह्या अनाडी व्याख्येचे विलक्षण तात्पर्य निघते!

बुद्ध : परंतु आम्ही आत्यंतिक अहिंसेचे मुळीच पक्षपाती नाही. इतकेच नव्हे तर साधुरक्षणाकरिता आणि आत्मरक्षणाकरिता आततायांचा प्रतिबळाने आणि प्रत्याघाताने प्रतिकार करणे ही हिंसा होत

नसून उलट हिंसेचा डाव हाणून पाडणारे पुण्यकर्मच होय असे तथागताचे मत आहे. पण हे गृहस्थाश्रमाचे कर्तव्य होय. संन्यासाश्रमाचे नव्हे!

विक्रम : आणि म्हणूनच मी म्हणतो की, ज्या संन्यासात अशा न्यायसंरक्षक कृपाणाचा आत्यंतिक संन्यास करावा लागतो तो विमुक्तद्वार संन्यासाश्रम ही कोणच्याही राष्ट्रावर ओढावणारी मोठ्यांतली मोठी आपत्ति आहे! नांगर धरावयाचा नाही, शस्त्रास शिवावयाचे नाही, अशा शपथा घेऊन ज्या राष्ट्रांतील लाखो लोक मठामठांतून पडून राहू लागतात ते संन्यासप्रवण राष्ट्र आज ना उद्या अन्न अन्न करून तडफडू लागलेच पाहिजे, दुबळे झालेच पाहिजे, कोण्या संसार-प्रवण आक्रमक राष्ट्राच्या व्याघ्राची झेप पडताच त्याच्या तीक्ष्ण पंजास बळी पडलेच पाहिजे! अशा संन्यासप्रवणतेचा पुरस्कार केल्याने ज्या लोककल्याणासाठी आपण मुक्तावस्थेतही ह्या धर्मचक्रप्रवर्तनाचा, ह्या संघाचा खटाटोप करीत आहात ते संसारी जगत् तर उच्छिन्न होईलच होईल. पण शेवटी ही आपली महान् धर्मसंस्था, हे संघ, हे लाखो भिक्षुगण, ह्या साधना, ह्या समाधि, ही तपोवने हे उभे संन्यासी जगतही क्रूर रानटी श्वापदांच्या आणि त्याहूनही क्रूरतर अशा राक्षसांच्या रक्तबंबाळ नखरांनी शतधा विदीर्ण होऊन नाश पावेल!

बुद्ध : पण सेनापते, संन्याशाच्या हातीही एक कृपाण असते. एक शस्त्र असते. ते लोहाचे नसले तरी आणि म्हणूनच ते लोहाहूनही अधिक परिणामकारी असते. त्या संन्याशाच्या शस्त्राचे नाव क्षमा आहे! विक्रम, ‘क्षमा शस्त्रं करे यस्य शत्रुस्तस्य करोति किम्?’

विक्रम : किम्? वधः! प्राणनाशः! दंड करण्याची ज्यास शक्ति आहे, तोच क्षमा करू शकतो. दंड करण्याची ज्यास शक्ति नाही त्या दुबळ्याच्या क्षमेस शरणागति म्हणतात- शस्त्र नव्हे! भुकेल्या रक्तलिप्सु वाघापुढे गाय मटकन् बसते, तिने क्षमाशस्त्र हाती धरले तरी क्षमाशस्त्रास भिऊन तो वाघ तिला सोडणार की काय! ती गाय मी तुला क्षमा करते म्हणून म्हणाली तरी तो वाघ तिला खाणारच, शरण आले म्हणून म्हणाली तरी खाणारच! दुष्ट शत्रूसही क्षमा करीत राहिले म्हणजे ते आगळीक करणे सोडतील अशा वेडगळ आशेवर जे राष्ट्र अवलंबून राहते ते राष्ट्र त्याच क्षमेला मानभंग समजून अधिकच क्रुद्ध झालेल्या त्याच दुष्ट शत्रूकडून संधि साधताच नायनाट करून टाकले जाते! अशी उदाहरणे इतिहासात घडली आहेत आणि हायहाय, अजून घडावयाची आहेत! हे आपले शाक्य राष्ट्र प्रजासत्ताक आहे. ह्याच्या एका बाजूस कोसलांचे प्रबळ राजसत्ताक राष्ट्र आहे, दुसऱ्या बाजूस मगधांचे राजसत्ताक राज्य आहे. ह्या दोन्ही प्रबळ राजकांच्या, राजसत्ताक राष्ट्रांच्या मध्ये, हे शाक्यांचे प्राजक सांपडलेले आहे. ते ज्या क्षणी लवलेशही दुर्बल होईल त्या क्षणी ते ह्या दोन्ही गिधाडांपैकी कोणाच्या तरी धाडीस बळी पडल्यावाचून राहणार नाही. अशा स्थितीत ह्या राष्ट्रातील लोकापुढे शस्त्रास न शिवणे हे उत्कृष्ट जीवन होय, नीतीची पराकाष्ठा होय, बुद्धाच्या कृपेस संपादण्याचा पवित्र मार्ग होय असे विकृत ध्येय धरणे मला अत्यंत आत्मघातकीपणाचे वाटते आहे!

बुद्ध : आपली भीति, जर एकट्या शाक्य राष्ट्रासच मी संन्यासप्रवण आणि युद्धविन्मुख करीत असतो तर, खरी ठरती; पण ज्या दोन आक्रमक राजकांची उदाहरणे आपण दिलीत त्यांसही मी युद्धविन्मुख करीत आहे; नव्हे जवळजवळ केले आहे. हे पहा, मनुष्यांनी मनुष्यांना केवळ पाशवी शक्तीच्या चढाओढीत श्रेष्ठत्व स्थापण्याकरिता तरवारींनी भाजीसारखे सपासप कापीत सुटणे हे आपणांस लज्जास्पद वाटते नाही का? तसेच मानव जातीतील सगळ्या राष्ट्रांनी जर या लज्जास्पद युद्धपिपासेपासून परावृत्त होण्याचा निश्चय केला, जर माझ्या धर्माची प्रेम-दया-क्षमा-शांति-अहिंसा ही अत्युदार तत्वे सर्वांनीच आचरली तर मग तरी एकट्या व्यक्तीस किंवा एकट्या राष्ट्रास भिण्याचे कारण नाही ना? हे पहा, तथागताने हा संघ स्थापन करून पुरती दहा वर्षेही झाली नाहीत तोच आपल्या शाक्य जातींवर ज्यांचे आक्रमण होण्याची आपणांस उत्कट भीति वाटते आहे ते कौसलचे महाराज प्रद्योतन आणि मगधांचे राजे बिबिसार हे दोघेही तथागत बुद्धाच्या धर्माची दीक्षा घेऊन आमचे शिष्य झालेले आहेत! जर शाक्य राष्ट्रातील कर्त्यातील कर्ते पुरुष जे सेनापती विक्रम, ते आपणही माझे नुसते शिष्यत्व न पत्करिता प्रत्यक्ष भिक्षुत्व स्वीकारून मजसहच ह्या दयामूलक धर्माचा प्रसार करण्यास बाहेर पडाल तर ह्या सर्व राष्ट्रांचा आमच्या उपदेशावर विश्वास बसेल; युद्धाची मनापासूनच आवश्यकता वाटणार नाही; किळस येईल; आणि मानव लोकातून युद्धाचे आमूलात् उच्चाटन करण्याच्या महत्पुण्याचे आपण वाटेकरी व्हाल! विक्रम, जगातून युद्धाचे, कलहाचे रक्तपाताचे उच्चाटन करणे हे ध्येय, त्याच्यासाठी आपण प्रयत्नांची आणि त्यागाची पराकाष्ठा करून पहाण्याइतके थोर नाही का!

विक्रम : भगवन्, ते तितके थोर आहेच आहे. पण ते शक्य आहे की नाही आणि त्यातही ह्या साधनांनी शक्य आहे की नाही ह्याची मला प्रबळ शंका वाटते.

बुद्ध : सेनापति, त्या शंकेविषयी मी इतकंच म्हणतो की थोडीशी श्रद्धा ठेवा! मला जर तुम्ही साह्य व्हाल तर सरासरी वीस पंचवीस वर्षांचे आत ह्या भारतात तरी शस्त्रयुद्धाची समाप्ति झालेली आपण पहाल! शस्त्रांचे युग जाऊन शांतीचे युग स्थापित झालेले पहाल!

विक्रम : ईश्वर करो आणि असेच होवो! मनुष्यसंहार करणारा मनुष्यजातीचा अत्यंत भयंकर शत्रु मनुष्यच होय, हा मनुष्यजातीवरील कलंक शक्य तितका लवकर धुवून निघो आणि शांतीचे साम्राज्य स्थापण्याचा मान आमच्या ह्या शाक्यसिंह तथागत बुद्धांनाच मिळो! परंतु सज्जनहो, मोठ्या दुःखाने पण निर्भीडपणे मी माझी भीति उल्लेखित करून ठेवतो की, पंचवीस वर्षांनंतरच काय पण आजपासून पंचवीसशे वर्षांनंतरही ह्या जगावर ह्या जगाच्या दुर्दैवाने शस्त्रयुगाचेच प्राबल्य दिसून येईल; बळी तोच कान पिळीत राहील; रक्तरंजित साम्राज्यांचाच विजयाश्व भूवर थैमान घालीत असेल आणि त्याच्या टापांखाली तेच अधिक आणि प्रथम चिरडले जातील की, जे या शांतियुगाच्या स्वप्नवाणीला भविष्यवाणी समजून तीवर विसंबून सर्वांआधी शस्त्रसंन्यास करतीलर दुसऱ्याच्या दयेवर अवलंबून रहाण्याइतके दुबळे होऊन बसतील! अहिंसेच्या आमिषापायी हिंसेचा गळा गिळतील! वाटेल त्याला संन्यासाश्रमात घेणाऱ्या आणि असा रीतीने लाखो लोकास

शस्त्रसंन्यासाच्या प्रतिज्ञेने हतवीर्य करून ठेवणाऱ्या ह्या भयंकर भुलीचे भीषण परिणाम पंचविसाव्या पिढीपर्यंत ह्या भारतास भोगावे लागतील! तथापि भगवान् बुद्धासारख्या अलौकिक पुरुषास ह्या पुण्यकार्यी सहाय्य मिळाले नाही म्हणून हा प्रयोग फसला असे पुढील पिढ्यांस चुकूनही वाटू नये म्हणून मी तथागताच्या इच्छेस अनुसरतो; आणि आजपासून या भिक्षुसंघात समाविष्ट होतो. (कटीचे कृपाण काढून) शाक्यांच्या सेवेस वाहिलेले हे माझे कृपाण आणि माझा एकुलता एक पुत्र वल्लभ ह्यास मी माझ्या ह्या शाक्य जातीच्या पदरात टाकून परिव्राजकांचा आश्रम स्वीकारीत आहे!

बुद्ध : सेनापते, देवांनीच धन्य धन्य म्हणून मान डोलवावी असा हा तुमचा लोककल्याणार्थ केलेला त्याग स्तुत्य आहे. हे पहा, काही झाले तरी शांतीचे, दयेचे, प्रेमाचे साम्राज्य ह्या जगतावर स्थापन करण्याचा आपण पराकाष्ठेचा प्रयत्न केला इतका उल्लेख जरी मनुष्यजातीच्या इतिहासात झाला, अशा प्रयोगाचे फल काय होते हा अनुभव जरी आपल्या सफलतेने वा निष्फलतेने मानवांस मिळाला तरी देखील ती निष्फलताही आंशिकतः तरी सफलच झाली असे म्हणावे लागेल! चला, शारिपुत्र संघागारात ह्या माननीय नवागतास नेऊन संघदीक्षा द्याच!

(चाल-रूप जोवन गुन घरो रहत है.)

आज शस्त्रयुग जगी सरतसे । शांतियुग अहा आले ।। ध्रु. ।।

दंड हिसकि त्या । दया परतवी । त्याग न वांछी । कलह विझाले ।। १ ।।

(सर्वजण 'बुद्धं शरणे गच्छामि, धर्मं शरणे गच्छामि, संघं शरणे गच्छामि' असे म्हणत जातात.)

अंक २ रा

प्रवेश १ला

सुनासशेट : (आनंदाने टाळी पिटून) वारली! शेवटी ह्या शाकंभटाची बायको वारली. काल ती पटकीने आजारी पडल्यापासून मी वाटच पहात होतो ती केव्हा मरते ह्याची! माझी आई मेली तेव्हा ह्या नीच शाकंभटाने किटाळ रचून तिचे प्रेत दारात पाडून टाकण्याचा प्रसंग आणला, त्याचा सूड उगविण्याची संधि आज मला आली. आता त्याचाच पेच त्याच्यावर मारतो. आईच्याविषयी भलताच दुर्लौकिक होऊ नये आणि अगदी चितेपाशीच माझ्या जातीचा बहिष्कार पडू नये म्हणून भिऊन तेव्हा जी सलकडी मी त्या भटुरग्याला दिली ती आता त्याला ओकावयास लावतो. वर त्याचे उरले सुरले घर पण गहाण लावून घेतो; तर त्याला सोडतो. त्याची बायको क्षारा ही माझी जीवश्चकंठश्च मैत्रिण होती. हिच्या प्रेतास अग्नि मी देणार म्हणून नुसती मी बोंबाबोंब करीत जातो! अरे शाकंभटा, जसे केलस तसेच भर आता!

(आतला पडदा उघडतो. शाकंभट क्षारेचे प्रेताजवळ उभा आहे.)

शाकंभट : गेली एकदाची ही बया! बायको पण बायको खरी जन्मभर भांडत मेली. आणि मेली ती इतक्या तडकाफडकीने की मी तिला विष दिल की काय अशी कोणा दुसऱ्यास तर काय, पण माझी मलाही शंका यावी. खरी पतिव्रता! तिच्याशी विवाह लावल्याची ठोक अद्दल मला तिच्या मरणानंतर देखील घडावी; इतक्या तडकाफडकीने मेली. ह्या आल्याच तिच्या साळकायामाळकाया! शेजारपाजारच्या बाया बापड्या! अजून तिचे प्रेत पडून एक घटका गेली नाही तोच जमल्या सगळ्या. घारीगिधाडांची टोळकी जशी जनावर मेले न मेले की जमतात तसे हे नातेवाईक कोण कधी मरत ह्याची वाटच पहात असतात. बाकी दुसऱ्याच्या घरी कोणी मेले की ती गंमत पाहण्यासारखी असते खरीच! एखाद्या दारिद्य्राच्या येथील लग्नाच्या वरयात्रेच्या वरातीच आमंत्रण आणि एखाद्या श्रीमंताच्या येथील प्रेतयात्रेची बातमी जर मला एकदम आली तर मी आधी त्या श्रीमंत मृतकाची गंमत पहावयास जाईन. ते प्रेताचे स्नान, ती मुलेबाळे पुन्हा भीतभीत; पुन्हा पुढे होत होत; पहात राहतात ते, ते बायकां-पुरुषांचे प्रदर्शन, ते पाळीपाळीने रडणे, उघड्या प्रेतांचा तो सडका हिडिसपणा आणि प्रेतावर सजावट केल्यानंतर शोभणारा तो सालंकृत हिडिसपणा, त्या ओट्या भरणे, ओट्या भरल्यानंतर काही काही बायकांची प्रेते देखील पुष्कळ जिवंत बायकांहून खुलून दिसतात. निदान या आमच्या लंकेहून तरी अधिक गोरी, हंसरी बरी दिसतातच! नंतर ती प्रेतयात्रा केव्हा केव्हा तर एखाद्या एकादशीच्या दिंडीस रंग नसतो इतका रंग प्रेताच्या मृतक यात्रेस भरतो; ते चितेचे भडकणे! कोणी मेलेल्या घरी ही सगळी गंमत चालली असता स्वतःच्या घरच्या जिवंत माणसाचे बोलावणे आले तर न जाता मन तिथेच रंगून जात ही गोष्ट पुष्कळांच्या अनुभवाची आहे. खरोखरच मनुष्य उत्सवप्रिय आहे; मग तो उत्सव मरणाचा का असेना! दुसऱ्याची गोष्टच सोडा; पण पुष्कळदा स्वतःच्या घरी जरी कुणी मेले तरी शोकाच्या खऱ्या आवेगातही जमलेल्या मंडळींचे मनास काय वाटते असेल; आपण रडतो तेव्हा ती अमकी गहिवरते

की नाही, तो अमका आपल्याकडे पाहतो की नाही, रडताना आपणांस अमकी वा अमका पाहील तर बरे असे विचार मनात आल्यावाचून राहत नाहीत. मला तर स्वतःचे प्रेतदेखील पाहण्याची एक प्रकारची विक्षिप्त हौस वाटते बुवा! ह्या आल्याच त्या सगळ्या जणी! आता मुख्य अडचण रडू येण्याची आहे. आज ओक्साबोक्शी रडलो नाही तर लोक काय म्हणतील? हो, एकुलता एक नवरा गेला तर बायका जशा रडतात तसे वास्तविकपणे अशी ही एकुलती एक बायको गेली म्हणजे आम्ही रडावयास हवे. पण अजून रडू येत नाही कसे, मला ओशाळल्यासारखे होत आहे. प्रेतसेस्काराचा शास्त्रोक्त आरंभ म्हणून गळा तरी काढलाच पाहिजे (रडू लागतो, तोच बायका येतात.) (स्वगत) अरे वा, रडता रडता मला खरेच रडू येऊ लागले!

बायका : (एकेकी एकेक वाक्य) अहो, भटजीबुवा आता मन आवराव म्हंटले. तिच्या जिवाच सोनेच झाले, होय, भरल्या ओटीन चालली. काय बाई तिचा चांगला स्वभाव असे! उगे भटजीबुवा, तुम्ही रडलेल पाहून आम्हांलाही रडू येत! ही पोरबाळे

शाकंभट : बायांनो, पोराबाळांच तेवढे वाक्य गाळा. प्रेतविधीच्या ठरलेल्या संस्कृत उद्‌गीताप्रमाणेच ठरलेल्या या प्राकृत वाक्यातील तेवढे वाक्य ह्या प्रसंगाचा विशेष अपवाद म्हणून गाळा, कारण तिला मुले नाहीत. आणि एक उरलेल तेवढे वाक्य म्हणा की, भटजीबुवा, जगाच्या रहाटीकडे लक्ष देऊन शोक आवरला पाहिजे. तेवढे कोणी तरी तुम्ही म्हणून टाकलंत की मला शोक आवरता येईल. (पुन्हा रडतो.)

बायका : (पाळीपाळीनं) भटजीबुवा, जगाच्या रहाटीप्रमाणे शोक आवरावा! हो, ती सुनासशेटची एवढी प्रत्यक्ष आई गेली पण आम्ही सांगताच त्यांनी शोक आवरला. ते इतके रडलेच नाहीत; आणि तुम्ही कसा अगदी धीर सोडता?

शाकंभट : बायांनो, ह्या तुमच्या आठवणीन तर मला अधिकच रडू कोसळत आहे, धीर खचत आहे! कारण जेव्हा सुनासशेटची आई गेली तेव्हा तुम्ही दहा संबंधी शेजारी बाया हळहळून त्यांना म्हणालात, ''आई गेली तर तर गेली; आम्ही आहोत ना? आम्हांस आईच्या जागी माना, आम्ही तुम्हांस तसेच संभाळू बरे!'' तेव्हा शेटजीनी शोक आवरला; पण आज माझी बायको वारली आणि तुम्ही इतक्याजणी येथे आहात पण कोणी असे म्हणत नाहीत की, ''शाकंभट एक बायको मेली खरी (रडत) पण आम्ही इतक्या बायका येथे आहोत ना; आमच्यातील वाटेल तिला तुम्ही क्षारेच्या ठिकाणी माना'' म्हणून!

सुनासशेट : (प्रवेशून रडत रडत) कुठे आहे ती माझी प्रिया! माझी क्षारा गेली हो मला टाकून. मला एकदा तरी तिचे शेवटचे आलिंगन घेऊ द्या हो!

शाकंभट : (ताडकन् उडी मारून) ए वाणगटा, काय म्हणतोस? (स्वगत) या राजश्रींच्या मनात माझ्यावर माझाच पेच मारायचा दिसतो. आले खरे बुवा घोंगडे गळ्याशी! पण आता रडून काय होणार? तोंड देलेच पाहिजे ह्या संकटाला (उघड) हं हं शेटजी! असे इकडे या.

सुनासशेट : भटुरड्या, आता सांग मी तुला धरला की नाही पेचात तो. आता तुझे नातलग येतील तेव्हा करतो बोंबाबोंब. नाही तर सलकडी परत दे आणि उरलेसुरले तुझे घर गहाण टाक! आणि..
शाकंभट : ती सलकडीबिलकडी राहू दे रे. अरे, मी चुकलो! तू क्षमा कर काही माणुसकी-
सुनासशेट : माणुसकी गेली आईच्या चितेवर जळून. सलकडी काढ. - घर गहाण! ते बघ तुझी जात आली, हं ओरडू का? (लोक येतात.)
शाकंभट : हं. चढला लेकाचा. चल तर ओरड काय ओरडायचे ते!
सुनासशेट : (रडत ओरडत) गृहस्थ हो, मला वेडा म्हणा! पिसाट म्हणा! पाजी म्हणा- पण मी शोकाने वेडा झालो आहे खरा. अहो क्षारा! माझी मैत्रीण- माझ्या आज आठ वर्षांची प्रियकरीण. माझे नाक तिला किती आवडे! आमच एकमेकांवर उत्कट गुप्त प्रेम होत हो! मला तिचे शेवटचे आलिंगन घेऊ द्या हो! तिच्या प्रेताबरोबर मी सहगमन करणार! सोडा हो मला!
लोक : भटजी, हे काय प्रकरण आहे? तुमच्या उभ्या कुळावर काळोखी फासतो आहे हा! खरे असले हे तर हा जातीचा प्रश्न आहे.
शाकंभट : असेल जातीचा. पण तो माझ्या नव्हे; त्या मेलेल्या प्रेताच्या जातीचा प्रश्न आहे. काय रे सुनास! काय तुला प्रेतास शेवटचे आलिंगन द्यायचे? सहगमन करायचे? हं चल तर (अस्तन्या सावरून) हं, चला बांधा यालाही तिरडीवर! आणा ते प्रेत!
(लोक प्रेत आणतात.)
सुनासशेट : (चमकून) आँ! अहो भटजीबुवा, असे एकेरीवर काय येता एकदम! काही तडजोडीचे बोलणे काढाल की नाही?
शाकंभट : वेड्या, अशा तुमच्या उत्कट प्रेमात तडजोड कशी शोभेल! त्या तुझ्या प्रियकरणीचा आत्मा तळमळेल तू तिच्याबरोबर जळला नाहीस तर! चला चला, बांधा याला या प्रेताशी!
लोक : अहो पण असा जातीतला भ्रष्टाकार! हे प्रेत! हे चालेल कसे?
शाकंभट : हे प्रेत ह्याच्यासुद्धा ह्या तिरडीसह चालेल माझ्या खांद्यावर बसून. (शेटजीस ओढून प्रेताच्या तोंडाकडे दाबतो.)
सुनासशेट : अरे बापरे, अरे मला ह्या प्रेतास पाहूनच धडकीच भरत आहे. मला जर क्षणभर तरी त्या प्रेताशेजारी लवंडाल तर भयान मी मूर्च्छित होऊन मरेन देखील. (शाकंभटाचे कानात) अरे, मला दहा रुपये दिलेस तरी पुरे, काही न बोलता परत जातो.
शाकंभट : भलतेच. आज तुला मी परत जाऊच देत नाही! तुझे प्रेम होत ना?
सुनासशेट : पण त्याचा भलताच अर्थ केलात तुम्ही! देवाशपथ तुझी बायको माझ्या उपाध्यायाची बायको- माझी मानलेली भावजय- बहिणीसारखे प्रेम रे!
लोक : लुच्च्या नाही तर! बांधा त्याला. तिच्याबरोबर सहगमन करायचे न? म्हणालास की नाही मघाशी असे सहगमन करायचे म्हणून?

सुनासशेट : अहो, म्हणजे तिच्या प्रेताला घेऊन स्मशानाकडे तुमच्यासह गमन करायचे. स्मशानापर्यंत जायचे असा माझा अर्थ हो! अरे बापरे अरे सोड!

शाकंभट : असा नाही सोडणार तुला मी! तिच्याबरोबर चितेवर ठेवणार, मग तेलाचे डबे तुझ्यावर ओतणार, मग लाकडे पेटून ज्वाला उठून, तू एखाद्या हिलालासारखा धड धड पेटशील, तुझे मांसरक्ताचे बिंदू फोडणीसारखे तडातड उडू लागतील.

सुनासशेट : (त्याच्या वाक्यागणीक चटके बसल्यासारख्या उड्या मारीत) अरे भाजलो, जळालो. माझ्या भाऊ, बाबा, माझ्या आई सोड मला. तू काय म्हणशील ते ऐकतो, सोड रे!

शाकंभट : तर मग काढ ही तुझ्या नव्या सलकड्यांची जोडी. माग ह्या सगळ्यांची क्षमा! घे एक तोंडात मारून, धर आपले कान नि जा! माझा पेच माझ्यावरच मारतोस काय? ध्यानात ठेव जेनो काम तेनो थाय दुजा करे सो गोता खाय! जा! जा! अरे कान सुटला! धर जा!

पडदा

प्रवेश २ रा

(सुलोचना व वल्लभ महालात बसले आहेत.)

सुलोचना : माझ्या वल्लभा! मी आपले नाव घेतले नाही हो. माझे दयित, माझे प्रियकर, अशा विशेषणांच्या अर्थीच मी असे म्हणते हो वल्लभा म्हणून. नाही तर आपले नावही तेच असल्याने आपल्या कान्ताचे नाव उखाण्यावाचून न घेण्याची कन्यकांची शालीनता मी सोडली असा माझ्यावर आरोप व्हावयाचा इकडून! आणि हा दोष असलाच तर तो आपल्या लडिवाळ अंगनेला, भाषेतील एक प्रेमळ विशेषण हिरावून घेऊन अशा अडचणीत पाडणारे हे नाव ज्यांनी आपल्याला ठेवले, त्या आपल्या मातापित्यांचा होय. खरे ना? मग म्हणू न वल्लभा म्हणून?

वल्लभ : म्हण हो माझ्या सुलोचने! -पण मीही तुझे नावही ते आहे म्हणून सुलोचना म्हंटले नाही हो! तुझ्या या मोहक नयनांची स्तुति म्हणून विशेषणार्थी तसे म्हंटले. नाही तर म्हणशील उखाण्यावाचून पुरुषाने बायकोचे नाव न घेणे हा शिष्टाचार मी सोडला म्हणून! आणि त्यातही तो दोष असलाच तर तो तुझ्या त्या मातापित्यांचा की ज्यांनी तुला हे असे सुलोचन देऊन आणि पुन्हा तुला तेच सुलोचना हे नाव ठेवून आमच्यासारख्या गुणग्राही प्रेमिकांना तुझ्या लोचनांची स्तुति करण्याचे नाव काढणे अशक्य करून टाकले.

सुलोचना : जा गडे, असे माझेच शब्द घेऊन मला नाही अडवायचे. पुरुषांना मौलिक असा, स्वतंत्र असा, विनोद करताच येत नाही वाटते; नाही तर आमची उष्टी कोटी कशाला चोरावी लागती अशी?

वल्लभ : तुमची एखादी कोटी आम्ही चोरली तर आमच लक्ष शंभरदा चोरून तुम्ही त्याची भरपाई करून घेता. मिळून फिटंफाटच!

सुलोचना : म्हणूनच वाटते आपल्या मजविषयीच्या लक्षाचे आताशा अगदी दिवाळे निघत आले आहे. खरेच वल्लभा, ह्या शाक्य राष्ट्राच्या सेनापतित्वाच्या पदावर आपली नियुक्ति झाल्यापासून मजकडे आपले लक्ष फारच कमी होऊ लागले आहे बरे का! कालपासून पहाते आहे की आपल्या ह्या प्रीति संगमाचा आज पहिला वाढदिवस आहे ही गोष्ट आपल्या लक्षात येते की नाही. सख्या, आता तरी आले का ध्यानात? आपल्या ह्या प्रीतिविवाहाचा पहिला वाढदिवस म्हणून कनी नाथा माझ्या मनात कामदेवाची पूजा बांधावयाची आहे.

(चाल: म्लान का मुखपंकजाभा)

स्वर्ग ज्याने वाचविला । कामदेवा नमन त्याला ।। ध्रु.।।

यद्‌बले स्त्री । विजय झाला । अंबिकेच्या । चरण चाला ।

वरति संशय नाचवीला । शंभु शंकर नाचवीला ।। १ ।।

वल्लभ : पण मी म्हणतो, कामदेवाच्या बलेकरून स्त्रिया जर एवढ्या बलशाली झालेल्या आहेत तर मग त्याच कामदेवतेच्या पूजेची अनुज्ञा मिळविण्याकरिता अबलेसारख्या आम्हा पुरुषांपुढे गयावया का करताहेत!

सुलोचना : आपण आता शाक्यराष्ट्राचे सेनापति झालात म्हणून! आपल्या सेनापतीपणाचा थोडासा तरी मान ठेवण्याचा शिष्टाचार आपला पाळावयाचा इतकाच. त्यातही आता आपल्या हृदयावरही माझी पूर्वीसारखी अनन्यसामान्य सत्ता उरली नाही. वीर पुरुषांच्या कटीला ह्या तेजस्वी असिलतेची एकदा का मिठी पडली की आम्हां अंगनांच्या तनुलतेचा ओढा तिच्यापुढ ढिला पडतो. ही माझी पाणीदार सवत मला केव्हा पाण्यात पाहू लागेल कुणी सांगावे? म्हणून म्हंटले तुम्हां दोघांस विचारून मग आपली लडिवाळ हौस पुरवावी. मग बांधू ना कामदेवाची पूजा आपल्या प्रीतिसंगमाच्या वाढदिवसाच्या मंगलमुहूर्ती?

वल्लभ : पण सखे, खरेच का आपल्या प्रीतिसंगमाचा वाढदिवस आला आहे? किती आनंदाची गोष्ट ही! तर मग प्रीतिविवाहाचा वाढदिवस नुसती कामदेवाची अर्चा करून कसा साजरा होणार? भगवान् कामदेवाची अर्चा करून प्रीतिजीवनातील कोणताही दिवस साजरा करता येतो ही कुलीन पद्धति आम्हांस ठाऊक आहे. पण आज प्रीतिसंगमाचा जर खराच वाढदिवस असेल तर सखे सुलोचने, तो दोहदपूर्तीनीच साजरा केला पाहिजे. मग बोला तर कोणते डोहाळे होताहेत माझ्या सुलोचनेला ते? आपले प्रेम वाढीस लागले; जे दुहेरी आहे ते, कल्याणी, आपले हे कौटुंबिक प्रेम तिहेरी होणार तर आता!

सुलोचना : पाहिलात ना पुरुषांचा दंडम विनोद. मला नाही असे आवडत. मामंजी आज इथे असते तर-

वल्लभ : तुझे तोंड देखील पाहते ना! कारण तुझे मामंजी एक प्रख्यात संन्यासी आहेत हे तुला माहीतच आहे. आणि संन्यासी स्त्रियांच स्मरणसुद्धा पाप समजतात. मग त्यांचा पक्ष घेऊन बोलण्याविषयी तर बोलावयासच नको.

सुलोचना : पण माझे मामंजी तसे पिसाट संन्यासी नसतीलच मुळी. तसे असते तर दासींच्या हाती माझ्यासारख्या उपवर कुमारिकेकडे गुप्त प्रणयपत्रिका धाडविणारा आणि माझे मन त्यांच्या हाती चोरून आपल्याकडे आणविणारा हा असा अट्टल प्रणयतस्करतनय त्यांस होताच ना? हाच माझा पुरावा!

वल्लभ : आणि हा माझा पुरावा. (पत्र पुढे करून) हे बघ माझ्या बाबांचे, तुझ्या मामंजीचे, स्वतःचे पत्र मला आजच आले आहे. आज इतके दिवसांनी बाबांच हे पत्र पाहून मला किती आनंद होतो आहे म्हणून सांगू! सुलोचने, माझे बाबा सेनापति विक्रमसिंह, ह्या शाक्य राष्ट्राचे धुरंधर विगत सेनानी, भगवान् बुद्धाच्या अत्याग्रहावरून त्यांच्या भिक्षुसंघात प्रविष्ट झाल्यास आज उणीपुरी चाळीस वर्षे होत येतील. त्या वेळी सुलोचने, तू ऐकलेच आहेस की मी अवघा दीड दोन वर्षांचा होतो. तेव्हापासून आजपर्यंत माझ्या माहितीत अशी दोन पत्रे काय ती बाबांकडून आली. एक सरासरी दहा वर्षांपूर्वी माझ्या वत्सल आईच्या मृत्यूचेविषयी माझे सांत्वन करणारे आणि दुसरे हे आता माझे अभिनंदन करणारे!

सुलोचना : कशाविषयी अभिनंदन केले आहे? आपल्या प्रीतिविवाहाची बातमी त्यांना कळली वाटते! सख्या, खरेच सांगावे ना; मामंजी रागावले तर नाहीत ना आपला संबंध ऐकून? तपोनिष्ठ संन्यासी, त्यातही भगवान् बुद्धाच्या स्त्रियांवर ते असे असे डोळे वटारणाऱ्या, भिक्षूचे नाव निघताच आम्हा वधूंना कशी गडे भीति वाटू लागते. स्त्रियांविषयी माझ्याविरुद्ध पुरावा म्हणून आपण ते पत्र विनोदातच पुढे केलेत ना? खरोखरीच विरुद्ध नाही ना काही त्यात? सांगाव ना गडे अभिनंदन कोणाचे ते?

वल्लभ : माझे! शाक्यांच्या सेनापतित्वाचे कृपाण बाबांनी चाळीस वर्षांपूर्वी जे खाली ठेविले ते आपल्या वंशास आज पुन्हा त्याच सेनापतिपदावर मला नेमून शाक्यराष्ट्राने परत केले आहे, याविषयी बाबांनी माझे अभिनंदन केले आहे. तुझ्याशी मी लग्न लाविले म्हणून ..

सुलोचना : म्हणून काय? रागावले? सांगून टाकायचे न? नाही रागावणार ते. मी त्यांच्या पाया पडेन. पाहू ते पत्र! जा. नाही देत? नाही? (जाऊ लागते.)

वल्लभ : ए वेडे, ऐकशील तरी. अग रागावले तर नाहीतच; पण उलट मी विवाहित झालो आणि त्यातही तुझ्यासारखी देवी यशोधरेच्या कोलियन कुलातील कान्ता-

सुलोचना : तसे नाही. पत्र दाखवा. आता तुमच्या सांगोपांगी बातमीवर माझा मुळीच विश्वास उरला नाही. दाखवायचे नाही न? पहा बरे! पुन्हा येणार नाही मागावयास!

वल्लभ : लग्नाच्या वाढदिवसाचा हा पहिला दोहदर, पहिले डोहाळे वाटते. ह्या लढाऊ डोहाळ्यांवरून मुलगा भांडकुदळ होणार आईसारखाच. ए सुलोचने- अग नाही, चुकलो! थांब, थांब, बापासारखा भांडकुदळ होणार, मग तर झाले! बरे तसेही नाही. मुलगा नाही मुलगीच होणार! अग हे घे पत्र, सुलोचने-

सुलोचना : द्या तर इकडे. आपण दोघे मिळून वाचू अं. नाही गडे आपणच वाचायचे. वाचायचे न!

वल्लभ : अग पण हो. (पत्र उघडून वाचतो.) - माझ्या तनया वल्लभा, मला आत्ताच बातमी कळली की, शाक्य प्राजकाच्या, शाक्यांच्या लोकसत्ताक राष्ट्राच्या नागरिकांनी, तुला सेनापतिपद अर्पिले आहे; ह्याविषयी मी तुझे आणि कोलियनांच्या प्रख्यात कुलाच्या ज्या वधूचे पाणिग्रहण केले आहेस म्हणून आम्हांस पूर्वीच समजले आहे त्या तुझ्या नववधूचे आम्ही मनःपूर्वक अभिनंदन करीत आहो. कामिनीचे आणि कृपाणाचे पाणिग्रहण ह्यास संन्यासी लोक तामसी, निषिद्ध, फार फार तर क्षम्य मानतात, पण उत्तेजनार्ह मानीत नाहीत, अशी साधारण समजूत असल्याने तुम्हांला ही तुमची कृति तुमच्या संन्यस्त पित्याला समर्थनीय वाटणार नाही असा संकोच होईल. पण वल्लभा, केवळ समर्थनीयचे नव्हे तर दांपत्यपदाची आणि सेनानीपदाची ही तुला झालेली प्राप्ति मला अभिनंदनार्हच वाटते आहे हे तुम्हांला आणि शाक्य राष्ट्राच्या इतर सर्व तरुणांना माहीत व्हावे म्हणून आम्ही हे अभिनंदनपर आशीर्वादपत्र हेतुतः पाठवीत आहो!

सुलोचना : (उसासा टाकून) नाथा, दयिता, माझा जीव एकदाचा खाली पडला. किती हो माझे ते वृद्ध मामंजी दयाळू आहेत. मला त्यांनी अजून पुरी पाहिली देखील नाही; तरी देखील किती ही वत्सलता! बरे वाचायचे न पुढे.

वल्लभ : पण ह्या पत्रातील पुढील भाग फारच गंभीर आहे.

सुलोचना : बरे मग तुम्ही तो असा अगदी निर्भेळ गंभीरपणाने (तोंड ताठर करून उभी राहते) वाचावे म्हणजे झाले.

वल्लभ : तीच तर अडचण आहे. एक वेळ समुद्राच्या पाण्याची चूळ भरून तोंड गोड करिता येईल, पण स्त्रियांच्या समोर उभे राहून ते गंभीर करता येणार नाही. निदान मला तरी बुवा तुला पाहिल्यावर थोड तरी हसल्यावाचून राहवत नाही.

(चाल - ब्रिजपत प्रभुदीन)

नारी विधि निर्मि मुळी । पिकविण्या हसे ।। ध्रु. ।।

नयनि तिखट जाता रडू आवरणे शक्य असे । परि

दिसता नारि हसू आवरणे शक्य नसे ।। १ ।।

सुलोचना : मी आहेच तशी एक हास्यास्पद वस्तु आपली! मग नाहीना वाचायचे ते माझ्या देखत? असे काय बरे? मला कनी अगदी कधी ऐकेन असे झाले आहे. ऐकायचे न माझे. अर्धांगी न ती मी आपली.

वल्लभ : मग हे घे अर्ध पत्र फाडून तुझ्या भागाचे नि वाच आपली कशी ती! बरे ये. सुलोचने, आता नाही तसे म्हणणार. ये! बाबा पुढे लिहितात, "इंद्रियांचा नाश हा काही इंद्रियजय नव्हे. संन्यासीही डोळे फोडून अंधळा होत नाही, जीभ छाटून मुका होत नाही, नाक शिवून निघ्राण होत नाही, हातपाय तोडून लुळापांगळा होत नाही. मग तीच गोष्ट सर्व देहेंद्रियव्यापारांनाही का लागू नसावी? ह्या सर्व इंद्रियांचे नैसर्गिक व्यापार सारखेच निर्दोष आहेत, समाजधारणास आवश्यक आहेत; अर्थातच दांपत्यजीवनाच्या आत्यंतिक त्यागातच तेवढे सर्व काही पावित्र्य आणि पुण्य साठविले आहे ही गोष्ट खोटी आहे. लोकोत्तर पुरुष संन्यासी होतात म्हणून लोकात असा भ्रम फैलावतो की ते संन्यासी झाले म्हणूनच लोकोत्तर समजले पाहिजेत. पण ते सत्य नाही. बुद्धासारखे महात्मे संसारात असले तरीही लोकोत्तर पदास आणि पवित्रपूजेस अधिकारी ठरलेच असते. एतदर्थ तूही वल्लभा, निस्संकोचपणे आपला दांपत्यधर्म योग्य रीतीने पाळ. बलिष्ठ आणि वशिष्ठ अशा प्रजेने तुझ्या कांतेचा कुसवा धन्य होवो. लोककल्याणार्थ धारण केलेला तुझा खड्ग दुष्टांस दंड देण्यास सदैव समर्थ असो! आणि ह्या यज्ञस्वरूपी जीवनयापनेत गृहस्थाश्रमाची सुखे तुझ्या पायांसच अडखळविणाऱ्या बेड्या न होता त्या यज्ञाची सांगता करणारे बलिदान होवोत! असा संसार संन्यासाइतकाच पवित्र आहे क्वचित् त्याहूनही श्रेयस्कर आहे!" ऐकलस ना किती उदात्त विचार आहेत ते!

(चाल: चंदा कमल बाल)

संसार रति होय । धर्मानुसरणांत । बेडी पदी ना । बलिदान जरि ही ।। ध्रु.।।
संसारचि धन्य । संन्याससम पुण्य । तो भोग श्रेयान् । त्यागाहुनीही ।। १ ।।

सुलोचना : ह्याला म्हणतात खरा वैराग्यवान् - खरा ज्ञानी, किती उदार मत आहे माझ्या मामंजीच पाहिलेत न! देवमाणस ही! पण वल्लभा, त्या संसारसुखाच्या बेड्या म्हणून मामांजीच्या पत्राचे शेवटी जो उल्लेख केला आहे तो कोणास उद्देशून?

वल्लभ : कोणास म्हणजे? स्त्रियांस! स्त्रिया ह्याच पुरुषांच्या पायांतील बेड्या!

सुलोचना : अस्सं काय? बरे नाथ, बुद्धदेव लोकोत्तर महात्मे आहेत ना?

वल्लभ : यात काय संशय! पण त्यांनी स्त्रीची बेडी पायातून काढून टाकिली म्हणूनच ते लोकोत्तर होऊ शकले.

सुलोचना : ते नाही मी आपणांला विचारले, आपण इतकेच सांगा की महाराज शुद्धोदनांनी म्हणजे बुद्धांच्या वडिलांनी जर मायादेवी म्हणजे बुद्धांच्या आईची बेडी पायातून अशीच तोडून टाकिली असती तर ह्या तुमच्या लोकोत्तर बुद्धदेवांचा लोकास पत्ता तरी कुठे लागला असता का? तर मग बुद्धांनी साधलेल्या लोककल्याणाचे अर्धे पुण्य तरी स्वतः बुद्धास साधणाऱ्या, त्यांचे अस्तित्व शक्य करणाऱ्या, स्त्रीजातीलाच मिळाले पाहिजे. कौसल्येच्या प्रेमाची सोनेरी साखळी एखाद्या मंत्रित रश्मीसारखी दशरथाच्या जीवनाशी संबद्ध झाली होती म्हणूनच रामचंद्रांची प्राप्ती शक्य झालीही. वसुदेवांनी जर लहानपणीच संन्यास घेतला असता तर श्रीकृष्ण काय गोकुळच्या गायरानात गवतासारखे उगवते?

वल्लभ : अग, पण ह्यावरून इतकेच सिद्ध होते की, स्त्रियांना पुरुषांनी अगदीच टाकाऊ समजू नये. पण म्हणून स्त्रिया संसारांतील पुरुषांच्या पायांतील बेड्या नाहीत असे का सिद्ध होते? त्या मुळीच नसत्या तर क्वचित् पुरुष जाति अधिक सुखी होऊ शकती इतके म्हणायला काय हरकत आहे?

सुलोचना : बरे. सोडून दिला तो विषयच. पण नाथ, गोष्टीवरून गोष्ट आठवलीच म्हणून दुसरेच एक विचारते. विषयांतर केले म्हणून हसायचे नाही अं! आपण आता सेनापति झालात, म्हणून शंका आली की सैन्यांत देखील सैनिक कारागृहे असतात हे खरे काय? त्यात फारच कडक शिक्षा देतात म्हणे. आपण जरा सदयतेने घ्याव बरे का.

वल्लभ : ते खरे. पण चोर, लुटारू, क्रूर इत्यादि भयंकर अपराध्यांना तरी तत्काळ बेड्या ठोकल्याच पाहिजेत.

सुलोचना : पण अशा राक्षसी, नृशंस, नीचांनाच तेवढ्या बेड्या ठोकल्या जातात नाही? -आपली आली लहर म्हणून सज्जनांना तर नाहीत ना?

वल्लभ : छट्. असा अन्याय कसा होईल! दुष्ट दुर्जनांनाच तेवढ्या बेड्या ठोकल्या जातात.

सुलोचना : तर मग प्रियकरा, आता तुम्हीच सांगा की, ज्या अर्थी, मनुष्यही दुष्ट दुर्जनांच्याच पायात बेड्या ठोकतो; सज्जनांच्या ठोकीत नाही; ज्या अर्थी, देव हा मनुष्याहून श्रेष्ठ असेल तर

अधिकच न्यायी असेल; कमी न्यायी असणे तर शक्यच नाही; आणि ज्या अर्थी तुम्हीच म्हणता की, स्त्रिया ह्या बेड्या पुरुषांच्या पायात देवाने ठोकल्या; त्याअर्थी, पुरुष पूर्वजन्मीचे कोणी तरी तसलेच अट्टल पापीच असले पाहिजेत नाही का? नाही तर, देव त्यांच्या पायात ह्या बेड्या ठोकताच ना! कोणाकोणाच्या पायात बेड्या ठोकतात म्हणून निर्बंध सांगितलात आपणच आता! चोर, लुटारू, दुष्ट, दुर्जन, अपराधी, पापी, आततायी, अशा विशेषणांच्या पदकांची गंडमाळची गंडमाळ गळ्यात घालून घेण्यास जर पुरुष सिद्ध असतील; तर आम्ही स्त्रियाही अशा पाप्यांच्या पायांतील देवाने ठोकलेल्या बेड्या म्हणवून घेण्यास सिद्ध आहो; समजले? बेड्या तर बेड्या. आम्ही स्त्रिया ह्या पुरुषांच्या अनर्गल रानटी स्वभावाच्या रानटी हत्तींच्या पायांतील त्यांस माणसाळविणाऱ्या शृंखला आहोत. आम्ही आहोत म्हणून त्यांचे पाय, धर्ममार्गावर, नीट पडत आहेत. ह्या बेड्या नसत्या ना, तर एखाद्या पिसाळलेल्या घोड्यासारखे, उन्मार्गावर हे पुरुष बेछूट उधळत जाते! का जिंकले की नाही? अरे, अरे! शाक्यांच्या सुविख्यात पौरुषशाली सेनापतीला, शेवटी, एका स्त्रीन जिंकले!

वल्लभ : शुभ चिन्ह आहे! आपल्या प्रेमाचे बीज ज्या दिवशी वाढीस लागले त्याच वाढदिवसाच्या मुहूर्ती माझ्या कांतेला दिग्विजयाचे डोहाळे होत आहेत; माझा मुलगा खरोखर चक्रवर्ती होणार!

सुलोचना : इश्श. आले प्रकरण मूळ पदावर.

दासी : (प्रवेशून) क्षमा असावी एकान्तभंगाची. पण राजसभेने सेनापति वल्लभसिंहास अत्यंत त्वर्य कामासाठी निकडीचे बोलावणे धाडले आहे! दूत बाहेर उभा आहे.

वल्लभ : सखे, गेलेच पाहिजे आहे. कौसलचा राजा तो दुष्ट महत्वाकांक्षी विद्युद्गर्भ, त्याच्या मनात आपल्या ह्या शाक्य राष्ट्राची काही तरी कुरापत काढण्याची इच्छा होती. परंतु त्याने शेवटी एक मैत्रीचा संधि करण्याचे ठरविल्याची सूचना कालच आली. ती महत्वाची चर्चा व्हावयाची असेल. दे तर निरोप.

सुलोचना : पण एक घडीभर थांबायचे! कामदेवाची पूजा बांधावयाची होती. ही माळ पुरी होत आहे. आज ..

वल्लभ : पाहिलेस! कर्तव्याच्या पायात स्त्रिया शृंखला-

सुलोचना : (त्याच्या तोंडावर हात ठेवीत) पुरे ते. जावे आपण कसे नीट! आम्हांला अशा ईर्षेला चढवून आपले संधान साधून घेण्याची ही पुरुषांची युक्तिच असते. पण प्रत्येक निमित्ताने येता जाता आपल्या वर्तनाची परीक्षा देत बसायला स्त्रिया काही कोणी उपजत अपराधी नाहीत नि पुरुष काही उपजत न्यायाधीश नाहीत. स्त्री कर्तव्याची शृंखला की पूर्ति हे तितकाच महत्वाचा प्रसंग आलाच तर येईल दिसून.

वल्लभ : तर मग तो महत्वाचा प्रसंग हाच आहे असे क्षणभर समज आणि दे पाहू हसत निरोप.

सुलोचना : मी नाही आज हसत निरोप देणार. नाही तर मग यायला वाटेल तितका विलंब कराल. निरोप नाही हसत देत; पण जर सभा संपताच मागल्या पायी पूजेच्या वेळेवर परत याल तर हसत सामोरी मात्र येईन, माझ्या दयिताला!

वल्लभ : हो न? मग काम संपताच हा आलोच बघ मागच्या पायी परत!

सुलोचना : या नाही तर येऊ नका. आपण नाही काही बोलत. कसा हा सोंगट्यांचा पट मांडून ठेवला होता. म्हंटले एखादा डाव खेळू आज! जार आम्ही अबोला धरला आहे!

(चाल - मंजुल रसना-)

जा जा न वचना । बोला । थांबवीत कोणी न आपणा ।। ध्रु.।।

कसा पट मांडिला । लव जरी खेळता या पला ।

त्यात थोरपण उरतेची ना ।। १ ।।

प्रवेश ३ रा

शाकंभट : हे बुद्धाचे एक बंडच आमच्या राजधानीत, ह्या कपिलवस्तूत शिरले आहे! त्याचे मनात ही राजधानी उजाड करून टाकावेयाची दिसते! मागे जेव्हा प्रथमच राजधानीला मुलाचा पाय लागला तेव्हा त्याचा वृद्ध बाप, आमचे महाराजे शुद्धोदन वारले. एवढे तरी बरे झाले की, संन्यासी भिक्षू असताही बुद्धाने आपल्या ह्या पित्यास मांडी तरी दिली! आणि लगेच राजवंशावर नांगर पण फिरविला; स्वतः तर भिक्षु श्रमणच, पण आठनऊ वर्षांचा राहुल युवराज पण त्याला भिक्षु केला. देवदत्त, आनंद इत्यादि त्याचे भाऊ सगळ्यांना भिक्षुधर्माची दीक्षा दिली! इतकेच नव्हे तर ह्या शाक्य प्राजकास कौसल आणि मगध ह्या प्रबळ राजकांच्या क्रोधापासून आणि लोभापासून ज्याच्या तलवारीने सुरक्षित ठेवले त्या सेनापति विक्रमदेवालाही ह्या राजश्रींनी नव्हे भिक्षुश्रींनी संन्यास दिला. आपल्या लहान पुत्रास, शिशु वल्लभदेवास पोरका करून तो सेनापति विक्रमदेव तेव्हा संन्यास घेऊन भिक्षु झाला तरी कसा? काही कळत नाही. बुद्धाच्या अंगात काही अद्भुत आकर्षणशक्ति आहे ह्यांत काही शंका नाही. कोण? ताकंसिंह.

ताकंसिंह : (प्रवेशून) शाकंभट आता मात्र ह्या बुद्धवेडाची पराकाष्ठा झाली खरी बुवा! अरे ऐकतोस काय? पूर्वी त्यांनी आपल्या यशोधरेला आणि त्याची आई महाप्रजापती या दोघा राजस्त्रियांस देखील श्रमणत्वाची, संन्यासाची, भिक्षुपणाची दीक्षा दिली. अरे, अगदी संन्याशासारखे त्या राजस्त्रियांचे सोंग बनविले की रे! केशवपन करून संन्यासी रंगाची भगवी वा पीत वस्त्रे देऊन त्यास भिक्षुणी करून सोडल्या! पण आता म्हणे बुद्ध भगवानांनी वाटेल त्या स्त्रियांना देखील भिक्षुणी करून संघात समाविष्ट करण्याचा सपाटा चालविला आहे.

शाकंभट : आणि हे भिक्षुणींचे, संन्यासिनींचे लटांबर ह्या भिक्षूंबरोबर, ह्या संन्याशांबरोबर मठांतून सहवास करणार आणि नगरग्रामांतून सहपर्यटन करणार ना? झाले! टाळी घे! अरे, जेव्हा राजकुमार सिद्धार्थ, हे आजचे बुद्ध, यशोधरेचा त्याग करून गेले तेव्हाच मी, आणि आमची ती 'अग', त्या वेळी जिवंत होती हो! तिने नि मी आम्ही स्पष्ट भविष्य वर्तविले होते की चार दिवस थारेपालट आणि वारेपालट करून ही स्वारी पुन्हा यशोधरेस ह्या नाही त्या रूपाने शोधीत येईल! यशोधरेसच नाही पण जसा राणीवसा तसाच एक भिक्षुणीवसा वसवील! बघ ते अक्षरशः खरे झाले. अरे! मी खरोखरीच एक भविष्यवादी आहे; असे माझे मलाच प्रामाणिकपणे वाटू लागले आहे! उगीच का माझ्या ताईत, गंडे, दोरे यांच्या प्रभावावर लोकाचा एवढा विश्वास बसला आहे! ताकंसिंह, तू बुद्धाच्याच जातीचा शाक्य क्षत्रिय आहेस. तू पण का नाही भिक्षु होऊन जात त्यांचे बरोबर! तुला तरी काय, माझ्याच सारखे ना घर ना दार! ना द्रव्य ना दारा!!

ताकंसिंह : आजपर्यंत मला त्या भिक्षुसंघाचे भय वाटे. वाटे भिक्षु म्हणजे जो भिक्षा मागतो तो! ज्याच्या दैवी दिवसा कांचनाचा दुष्काळ आणि रात्री कामिनीचा; ज्याच्या हाती ना स्वर्गधन, ना स्त्रीधन. जो सर्वस्वी निर्धन त्या दारोदार भटकत फिरणाऱ्या कोण्या दरिद्री हडकुळ्या भिकारड्याचे भूत भिक्षु म्हणताच आजवर माझ्या डोळ्यांपुढे उभे राही. पण आता पहातो तो राजश्रींचा थाट

एकीकडे; आणि भिक्षुश्रींचा एकीकडे. ह्यांच्यांतील अगदी सामान्यांतील सामान्य भिक्षुही माझ्याहून खाऊन पिऊन सुखी दिसतो.

शाकंभट : आणि आता शिष्यिणींचे सुंदर कळप त्या मठामठांतून पाळले जाणार असल्यामुळे ही मंडळी खाऊन पिऊनच नव्हे; तर तुझ्या माझ्यासारख्या, दुसऱ्या लग्नाची काही आशा नसलेल्या विधुरांहून, निजून उठून देखील अधिक सुखी होणार! अरे, विधुरांची गोष्ट राहोच. पण आमची ती जरी आता जिवंत असती ना तर तिच्यासुद्धा मेहुणच्या मेहुणच संन्यासी होऊन संसाराचे सुख फुकटंफाकट भोगावयास गेलो असतो की ह्या पंथात!

ताकंसिंह : अरे, तुम्हा ब्राह्मणांना भिक्षु होण्यास इतके कठीण जात नाही. कारण भिक्षा ही तुमची मूळची दीक्षा! पण राजराजैश्वर्य भोगणाऱ्या आम्हा क्षत्रियांस थोडी फार लाज वाटावयाचीच; हा भिक्षेचा मार्ग स्वीकारावयास!

शाकंभट : म्हणूनच वाटते की हा, हा पंथ, कोण्या ब्राह्मणाने काढावयाच्या आधी एका राजराजैश्वर्य प्रत्यक्ष भोगणाऱ्या क्षत्रियाने, सिद्धार्थानेच काढला! अरे वेड्या, हा पंथ म्हणजे क्षत्रियांस मिळालेली एक मृत्युंजय मात्रा आहे मात्रा! बुद्धधर्मात या; कारण त्यायोगे मरण टळते असे त्याचे माहात्म्य बुद्धाचे शिष्य दारोदार सांगत फिरत आहेत हे तू ऐकतोसच. ते ब्राह्मणांविषयी खरे असो वा नसो; पण क्षत्रियांविषयी मात्र अगदी सत्य आहे. कारण ब्राह्मणांचे मरण कावळ्याच्या मरणासारखे केव्हा तरी योगायोगाने घडले म्हणजे घडते. पण क्षत्रियांची सापासारखी मरणाशी पदोपदी गाठ पडणार! क्षत्रिय सापासारखा बाहेर पडावयाचा अवकाश की तो दुसऱ्याला डसल्यावाचून सोडणार नाही आणि दुसऱ्याकडून दिसेल तिथे ठेचला गेल्यावाचून सुटणार नाही. म्हणून आता ह्या बुद्धपंथात क्षत्रियांचीच दाटी होत आहे कारण एकदा संन्यासाचा बुरखा घेऊन गृहस्थाश्रमाचे धोतर सोडले, की कटीचे कृपाण आपण होऊनच खाली गळते. म्हणजे पुन्हा लढाईचे तोंड बघावयास नको. शाक्य राष्ट्रावर कोसलचा राजा चालून येवो किंवा मगधाचा येवो-राजराजैश्वर्य भोगावयाचे आहे म्हणून क्षत्रियांस प्रथम लढाईवर जावे लागे; पण आता ह्या बुद्धपंथाच्या संन्यस्त भिक्षूची दीक्षा घेतली की, अपघाती मरणाच्या त्या कटकटीतून ते पार विमुक्त होतात. ऐश्वर्याचा भोग मठांतूनही मिळतोच! अशी तुम्हा क्षत्रियांची ही दुहेरी सोय झाली आहे. बुद्धांना शरण गेल्यान तुमच मरण टळत खरेच. उगीच नाही मागे ते सेनापति विक्रमसिंह देखील भिक्षु झाले! ताकंसिंह, थांब! हा त्या भिक्षूंच्या टोळधाडीतील एक टोळ इकडेच येतो आहे बघ! त्याच्या पंथाविषयी तो काय माहिती सांगतो ती गंमत तरी ऐकू ये. अरे, हा तर त्या कृषिपल्ली खेड्यातील काणा भिकारडा; पण ह्यास ओळख द्या कशाला!

काणाभिक्षु : (प्रवेशून) बुद्धं सरणम् गच्छामि, धम्मम् सरणम् गच्छामि, संघम् सरणम् गच्छामि। (भिक्षेची थाळी पुढे करतो.)

शाकंभट : भिक्षु, तुमच्या पंथात शिरण्यात विशेष लाभ कोणता आहे?

काणाभिक्षु : पोट भरपूर भरते आणि जन्मापासून, रोगापासून, म्हातारपणापासून आणि मरणापासून मनुष्य मुक्त होतो.

शाकंभट : बाकी सोड; पण निदान रोगापासून तरी मनुष्य मुक्त होतो हे जर खरे आहे तर मग हा तुझा एक अंधळा डोळा तरी त्या पंथात जाताच तुझ्या गुरूने का बरा केला नाही?

काणाभिक्षु : मी नवा भिख्खु आहे. मुख्य गुरू अजून मला ओळखीत नाहीत. पण उपगुरुजींनी मला सांगितले आहे की, बेटा! तुझ्या ह्या एका डोळ्यानेच ह्या दुःखपूर्ण संसारात जी दुःखे तू पाहिलीस ती तुला पुरेशी झाली नाहीत की काय? तर तू उरलेली दुःखे पहावयास दुसरा नित्याचा मिटलेला डोळा उघडण्याची विनंती करीत आहेस? तुझे पूर्वजन्मीचे संचित पुण्य उघडले म्हणून तुझा एक डोळा उघडलाच नाही. आणि ह्या अत्यंत दुःखमय हिडीस संसाराचे अर्धे दुःख पाहण्याच्या यातना आपोआप टळल्या! एक डोळा आहे तर इतकी दुःखे पाहिलीस, दोन्ही डोळे असते तर ही उत्तप्त दुःखे पाहता पाहता दिपून जाऊन आंधळाच झाला असतास!

ताकंसिंह : कायरे भिक्षु, तुझ्यासारखी धट्टीकट्टी माणसे अशी भीक मागताना तुम्हांला लाज वाटते का रे? लोक धिक्कार करीत धक्के मारून हुसकून नाही का रे देत!

काणाभिक्षु : वा, ते काय म्हणून? मी पूर्वी भिकारी म्हणून भीक मागत होतो तेव्हा वाटे त्याची लाज- तेव्हा लोकही धक्के मारीत, पण आताशी मी भिक्षु म्हणून भीक मागत असतो. म्हणून आता लोक मला आपण होऊन भिक्षा वाढतात. कारण नुसत्या भिकाऱ्यावर भीक घालणारे उपकार करतात; पण भिक्षु किंवा गोसावी किंवा बैरागी होऊन जो भीक मागतो तो उलट भीक घालणाऱ्यावर उपकार करतो असा गुरुचा उपदेशच आहे मुळी ह्या लोकास.

शाकंभट : बरे; तुमच्या ह्या धर्ममताचे सार तू काय समजतोस थोडक्यात?

काणाभिक्षु : वेदांची निंदा करावी; ब्राह्मणांची निंदा करावी; आणि अशा भटांच्या नादी न लागता आम्हा भिक्षूंच्या नादी लागते जा म्हणून लोकास उपदेश द्यावा!

शाकंभट : होय का! बरे तर मग मीही असाच भट आहे. म्हणून तू ह्या भटाच्या दारी भिक्षेच्या नादी लागू नको. जा! नाही तर (चापट उगारून) हा भिक्षेचा निनाद ऐकावयास मिळेल.

काणाभिक्षु : (दूर हटून स्वगत) अरेरे, हा ब्राह्मण आहे हे मला कसे दिसले नाही! हाय! हाय!जर मला दोन डोळे असते तर त्याच्या गळ्यातील जानवे त्याच्या अंगरख्यातून देखील मला स्पष्ट दिसू शकते. बुद्धं सरणं गच्छामि, धम्मम् सरणं गच्छामि, संघं सरणं गच्छामि. (जातो.)

शाकंभट : हां हां सरणं गच्छ, लवकरच गच्छ, नाही तर गच्चूच मिळेल! सरणातच जा! पण ताकंसिंह, ते काही असले तरी पोट भरपूर भरते हा जो काण्याने ह्या बुद्धसंघात जाण्याचा विशेष लाभ म्हणून सांगितला तेवढा देखील ह्या संघात जाण्यासाठी आपले मन वळविण्यास पुरेसे कारण आहे!

ताकंसिंह : पण वेदनिंदा म्हणून त्या संघाचे त्याने वैशिष्ट्य सांगितले. तू ब्राह्मण..

शाकंभट : अरे, वेदांनी माझे तोंड पाहिलेले नाही आणि मी त्यांचे तोंड पाहिले नाही. ज्या मनुष्याची तोंडओळख देखील नाही त्याची निंदा काय आणि स्तुति काय! पुन्हा ताकंसिंह, मी ब्राह्मण आहे म्हणूनच मी स्थितप्रज्ञही आहे. 'तुल्यनिंदास्तुतिर्मौनी' ह्या भागवत मंत्राच्या ताइताचे ढालीवर मी मजवर नेहमी येणाऱ्या माझ्या निंदेच्या आघातास विफल करीत असतो आणि माझ्या स्तुतीचे संकट मजवर कोणी कधी मुळी आणूच धजत नाही. अरे, हा आला पण दुसरा टोळ. गंमत करू ये पुन्हा थोडी!

दुसरा भिक्षु : (प्रवेशून) बुद्धं सरणं गच्छामि, धम्मम् सरणं गच्छामि, संघम् शरणम् गच्छामि.

शाकंभट : थांबा, थांबा, संघाला शरण जाण्याचे आधी मला धर्मासंबंधी थोडेसे विचारावयाचे आहे. पण ह्या धर्माचेही बोकांडी बसणारा हा बुद्ध कोण? ब्राह्मण धर्माचे नांवाखाली आपले स्तोम माजवितात म्हणून तुम्ही भिक्षु म्हणता, पण हे नवे आचार्य तर धर्माच्या डोक्यावरच आपले स्तोम स्थापितात. प्रथम बुद्ध! प्रथम त्यांना वंदन करा आणि मग बिचारा धर्म!! तसेच ब्राह्मणांची निंदा हेही तुमच्या धर्माचे एक तत्व आहे, हेही आत्ताच पाहिले.

दुसरा भिक्षु : छेः! छेः! हे काय भलतेच. तुम्ही चुकता आहात.

शाकंभट : असेनही मी चुकत क्वचित्. कारण तेव्हा मी तुमच्या धर्माकडे एका चकण्याच्या एक डोळ्यानेच पहात होतो. म्हणूनच आता तुमच्या दोडोळी दृष्टीनेही एकदा त्याचे स्वरूप पाहू इच्छितो.

दुसरा भिक्षु : हे भद्र पुरुषा, बुद्धाचे अनुशासन कौमुदीसारखे शीतल आहे. संतापाच्या दुरुत्तराने आम्ही संतापत नाही, तर उलट त्या संतापास आमच्या विनयशील वचनाच्या शीतलतेने शमवू इच्छितो. भगवान् बुद्ध ब्राह्मणांची निंदा करीत नाहीत इतकेच नव्हे तर ते त्यांचा अत्यंत आदर करितात. त्यांच्या पट्ट शिष्यांतील प्रमुख शिष्य ब्राह्मण जातीतीलच आहेत. भगवान् म्हणतात ते इतकेच की परोपकारव्रत, निरहंकारी आणि ब्रह्मविद् असा जो सत्पुरुष तो खरा ब्राह्मण होय. त्याचा आदर चराचर विश्व करीत राहील. मग त्याची जन्मजात कोणतीही का असेना? प्रश्न गुणाचा आहे. जन्माच्या आकस्मिक योगायोगाचा नाही. अहो ज्यांस अस्पृश्य म्हणून जग धिक्कारते त्यांसही ते दयाळू भगवान् बुद्ध आदराने जवळ करतात - सन्मानतात मग 'कि पुनर्ब्राह्मणाः पुण्याः भक्ताः राजर्षयस्तथा'! बुद्धाची दया महासागरासारखी खोल, आकाशासारखी विस्तृत! त्रिविध तापांपासून मुक्त होऊ पाहणाऱ्या अखिल मानवांनो, म्हणा, बुद्धं सरणं गच्छामि, धम्मम् सरणं गच्छामि, संघं सरणं गच्छामि! (जातो.)

शाकंभट : अरे, हा भिक्षेकरिता देखील थांबला नाही.

ताकंसिंह : त्याचे विचार पण किती गंभीर! तुम्ही आम्ही अशा संघात कोणत्या झाडाचा पाला!

शाकंभट : ते का? चल तू नि मी करू ये गंभीर विचार आत्ताच्या आत्ता. ह्या संघात जाण्याच्या लाभाचीच चिकित्सा करू ये. काय? पहिल्याने ह्या संघात गेल्याने जन्म टळतो म्हणे. त्याचे

आपणांस काहीच सोयर सुतक उरत नाही. कारण हा जन्म तर येऊन गेलाच. आणि दुसरा जन्म येण्याची निदान ह्या जन्मी तरी काही भीति नाही. दुसरे काय?

तांकसिंह : मरण टळते! हा मात्र आश्चर्यकारक लाभ आहे, नाही?

शाकंभट : हो. क्षत्रियांना लढाईवरील मरणाच्या पंजातील ही पळवाट सापडली खरी! पण अंथरुणावरील मरणाच्या हातून ह्या संघात जाताच कोणचाही मनुष्य सुटतो का? पुन्हा मरण टळते म्हणजे कोणाकोणाचे? एकटे तुझे माझेच का तुझ्या माझ्या शत्रूंचे पण? माझ्याप्रमाणेच मनुष्यमात्रांचेही मरण टळत असेल तर त्यापेक्षा मरण आलेले काय वाईट? मी चिरंजीव होणार! माझा शत्रुही चिरंजीव होणार! म्हणजे आमची भांडणे, भीति, मत्सर आणि मारामाऱ्या हे सगळे लटांबरही चिरंजीव होणार! पुन्हा असे पहा की, मरण टळणे म्हणजे जन्मभर जिवंत राहणे. पण त्याबरोबर खायला प्यायलाही हवे! नुसते मरण टळून उपयोग नाही. दुष्काळ, दारिद्य्र नि दगदग ही टळली पाहिजेत. पण तरीही अडचणच. अरे, जो तो जर जन्म झाला की चिरंजीव होत चालला तर ह्या जगात नुसती जागा देखील मिळणार नाही, जागा रहायला! मी तू आमचे पुत्र, पौत्र, प्रपौत्र, त्यांची मुलेबाळे, सुनालेकी, त्या मुलांची मुलेबाळे सुनालेकी एकेका घरात सात सात नव्हे तर सत्तर सत्तर पिढ्यांचे पूर्वज जिवंत एका पंक्तीस जेवायला बसणार. तांकसिंह, घे टाळी! त्यांचा सैपाक- ती सत्तराव्या पिढीची, पणजीच्या पणजीची पणजी, मोठ्या सासूबाई म्हणून करीत बसणार! आणि तिच्या पाठीशी खेळत घरांतील लेकरू म्हणून पणतीच्या पणतीच्या पणतीच्या पणतीची- श्वास गुदमरून गेला. बापरे! अरे, एवढ्या कुटुंबास नुसत्या नात्यांचे शब्द देखील पुरविता नाकी नव येतील. नावे पुरणार नाहीत नावाने हाका मारण्यास, मग अन्न वस्त्र पुरविण्याची गोष्ट दूरच. छट् मनुष्यमात्राचे मरण टळण्याचा मार्ग जर बुद्धांनी खरोखरच शोधून काढला असेल ना तर मनुष्यमात्राच मरणच ओढवले असे समज. त्यातही जर मरण टळले तर सरण पुरविणारे हे स्मशानातील सर्पणविके तर ठार मेलेच म्हणून समज! धंदाच बसणार त्यांचा. त्यांना स्वतःला जाळण्यापुरत्या लाकडांची देखील त्यांची विक्री होणार नाही. बघ ही बुद्ध धर्मातील व्यंगें मला कशी स्पष्ट दिसताहेत! थांब, मीच स्थापू का एखादा धर्म? होऊ का एखादा प्रतिबुद्ध? छट विचार फारच गंभीर होत चालला नाही कारे माझा?

तांकसिंह : म्हणूनच म्हणतो, सोड तो विषय. माझ्या मेंदूवर इतका ताण पडू पहात आहे की, मज्जापिंड फुटून बुद्धपंथात जाऊन उद्या टळणारे मरण आजच ओढवायचे. मग संघात नाही जायचे न त्या?

शाकंभट : छे छे तसे कशाला? कारण आपले मुख्य ध्येय मरण टाळणे हे नसून मरेतो चैनीत जगायचे कसे हे आहे. आणि भिक्षु होऊन बुद्ध संघात जाताच जेवण भरपूर, भिक्षा भरपूर, भिक्षुणी भरपूर, काबाडकष्ट मुळीच नाहीत. कोणाकडून तरी उदरंभरणाची आपली वृत्ति साधायची ना? आणि आज जुन्या प्रवृत्तिमार्गापेक्षा आता ह्या नव्या निवृत्तिमार्गाने ती अधिक साधते आहे. प्रवृत्ति काय? निवृत्ति काय? दोहींत वृत्ति आहेच. आम्ही ब्राह्मणी भिक्षुक प्रवृत्ति चालवितो. प्र-

म्हणजे असा चक्क पुढे हात पसरून वृत्ति म्हणजे दक्षिणा मागत होतो; तर हे बुद्ध भिक्षु निवृत्ति, नि म्हणजे असा नको नको हा संसार म्हणत, दूर सरत, हात पसरून वृत्ति म्हणजे भिक्षणा मागतात. मिळून वृत्ति साधतेच! चल आपण तर जाणारच त्या संघात.

ताकंसिंह : मीही येणार. येत्या जात्या लढाईतून क्षत्रिय म्हणून यमराजाकडून वेठीस धरले जाण्याची भीति तरी उरणार नाहीच नाही असा भिक्षु होताच!

शाकंभट : चल तर म्हण "बुद्धं सरणं गच्छामि, धम्मंम् सरणं गच्छामि, " अरे थांब, पण ताकंसिंह बुद्धांनी संघात भिक्षुणी घेण्यास आरंभ केला आहे ही तू आणलेली बातमी अगदी खरी आहे ना?

ताकंसिंह : अरे, माझ्या मेलेल्या धर्मपत्नीच्या स्मृतीला साक्ष ठेवून सांगतो की ही बातमी खरी आहे. नाही तर मी काय कोणी अविचारी गृहस्थ आहे की काय की भिक्षु होण्यास इतका उताविळपणे सिद्ध होईन!

शाकंभट : म्हण तर मग ती उरलेली प्रतिज्ञाही, "संघं सरणं गच्छामि."

प्रवेश ४ था

(सेनापति वल्लभसिंह महानामा महाराजांना वंदना देत येतात.)

वल्लभ : महाराजे महानामा ह्यांचा आणि शाक्य प्राजकाचा जयजयकार असो!

महानामा : या, सेनापति तुम्हांला कल्पनाही नसेल इतके मोठे संकट ह्या आपल्या शाक्य राष्ट्रावर एकाएकी कोसळले आहे! हा लखोटा सांगतो की, सर्वांस इकडे मैत्रीचा संधि करण्याच्या थापा ज्याने कालपर्यंत दिल्या आणि त्यामुळे कालपर्यंत आम्हांस मोहनिद्रेत ज्याने फसविले; तो कोसलचा राजा विद्युद्गर्भ एकाएकी दोनतीन बाजूंनी शाक्य राष्ट्रावर तुटून पडून वादळासारखा पुढे घुसत येत आहे! सरासरी चाळीस वर्षांपूर्वी, राजे शुद्धोदन, ह्या शाक्य राष्ट्राचे नृपति, वारले. त्यांचे पुत्र सिद्धार्थ, भगवान बुद्ध, तर त्यांचे आधीच संन्यासी होऊन गेले. इतकेच नव्हे तर त्यांचा मुलगा राहुल, भाऊ आनंद, चुलत भाऊ देवदत्त, पत्नी यशोधरा, राजमाता, मोठमोठे श्रीमंत कुलातील सरदार, शूर वीर, यांनाही संन्यस्त भिक्षुधर्माची दीक्षा देऊन बुद्ध आपल्या संघात नेते झाले. पण ह्याहून ह्या शाक्य राष्ट्राची प्रबलतम हानि ज्यांच्या संन्यासाने झाली ते सेनापति विक्रमसिंहही बुद्धांच्या अत्याग्रहावरून संसाराचे कृपाण खाली ठेवून संन्यासाचे कौपीन स्वीकार करते झाले! कारण बुद्धांनी प्रतिज्ञा केली होती की, जर सर्व राष्ट्रे आपापली कृपाणे, आपापली शस्त्रे आपणहून खाली ठेवतील आणि सर्वजण शस्त्रधारणाच्या क्रूर कर्मास पापासारखे त्याज्य समजतील तर पृथ्वीतलावरून युद्धाचे उच्चाटन करून टाकून शांततेचे आणि दयेचे साम्राज्य सर्वत्र ह्या पिढीचे डोळ्यादेखतही नांदू लागेल! ह्या दिव्य देखाव्याने दिपून ह्या शाक्य राष्ट्रातील झाडून साऱ्या कर्त्या पुरुषांनी बुद्धांच्याप्रमाणेच संन्यासाचा असा आश्रय केला. ही राजधानी पराक्रमशून्य झाली. पराक्रमाला पाप समजले जाऊ लागले. दंडशक्तीला उद्दंडतेसारखे हीन लेखण्यात येऊ लागले! अशा स्थितीत आम्हांस आपल्या ह्या गणतंत्राने, ह्या प्राजकसभेने शुद्धोदन महाराजांच्या राज्यासनावर बसविले. पण आम्हीही भगवान् बुद्धांचेच शिष्य झालेलो होतो. त्यायोगे शस्त्रबळाची आज चाळीस वर्षे अक्षम्य उपेक्षा झाली! आणि त्याचेच हे कडू फळ आता आम्ही उपभोगीत आहोत.

वल्लभ : चिंता नाही. शाक्य हो! अजूनही शत्रूनेच आरंभिलेल्या शस्त्रयुद्धात देखील आपण शत्रूंस चीत करू शकू. आता प्रथमतः आपण सर्वांनी शाक्य राष्ट्राची ज्याच्या पराक्रमावर आणि प्रामाणिपणावर अधिकांत अधिक निष्ठा असेल अशा कोणा पुरुषास युद्धकालापुरते शाक्यांचे सर्वाधिकारित्व अर्पण करावे. बहुमुखी बजबजपुरीपेक्षा युद्धकाळात राष्ट्रशक्ति एकहाती, एककेंद्री, एकमुखी असणेच अत्यंत हितावह असते. त्यायोगे आपले विखुरलेले शक्तिपुंज आता एकवटतील, आणि ते संहतबल अजूनही शत्रूंस भारी होईल. ज्याचा शब्द सर्व शाक्य राष्ट्र स्वयमेवच निर्बंधवत् मानील असा पुरुष.

एक सरदार : आहे. असाही पुरुष आमच्या सुदैवाने शाक्यांत अजून जिवंत आहे. ज्याच्या खड्गाच्या धारेस हेच कोसलांचे सैन्य चळाचळा कापत आले आहे आणि ज्याच्या हाकेसरशी

आजही हे शाक्य राष्ट्र आत्मविश्वासाचे स्फूर्तीने संचरित होऊन संग्रामात उडी घेऊ शकेल असा एक पुरुष, असा एकच पुरुष आजही आहे - पण हाय हाय तो संन्यासी झालेला आहे! त्याचे नाव? आमच्या ह्या तरुण सेनापति वल्लभांचा वृद्ध पिता आमच्या ह्या शाक्य राष्ट्राचा पितामह भीष्म. आमचा विगत सेनापति विक्रमसिंह!

महानामा : तोच प्रतापी पुरुष अजूनही आपल्या राष्ट्राच्या संकटात आपल्याला काही तरी मार्ग काढून देईल अशी मला पूर्ण आशा वाटते. तो पहा! त्या आपल्या विगत सेनापतीचा खड्ग! ज्या दिवशी सेनापति विक्रमसिंहाने, त्यांच्या मते शस्त्र हे शास्त्राइतकेच परमपूज्य आणि लोकधारणेस अत्यंत अवश्य असे साधन वाटते असताही बुद्ध भगवानांच्या अत्याग्रहासाठीच तो खड्ग खाली ठेविला; आणि संन्यस्त भिक्षूची दीक्षा ग्रहण केली तो दिवस मला अजून स्पष्टपणे आठवत आहे! त्या दिवसापासून ह्या आपल्या शाक्य राष्ट्रसभेने तो खड्ग स्वतःच्या कृतज्ञतेचे दिग्दर्शन म्हणून एखाद्या देवतेसारखा, ह्या भवनात पूजित केलेला आहे. ह्या खड्गाचे सहाय्याने विक्रमसिंहानी आपल्या राष्ट्रशत्रूंची दहादा दाणादाण उडवून दिली! तो हा खड्ग आपल्या राष्ट्राची मूर्तिमंत स्फूर्ति आहे. मी म्हणतो सामंत आणि सभ्यहो, ह्या बिकट प्रसंगी सेनापति विक्रमसिंहास आपण आपले सर्वाधिकारी नेमून त्यास परत बोलाविण्यासाठी जो संदेश धाडावयाचा तो ह्याच दूताचे हाती धाडावा! कोणाचीही मानवी जिव्हा आपले हृद्गत इतक्या वक्तृत्वमय भाषेत सांगू शकणार नाही की, जितक्या हृदयोद्दीपक वाणीत ह्या खड्गाची ही लोहजिव्हा तो सांगू शकेल. सेनापति विक्रमसिंहाला तरी ह्या खड्गाच्या लोहजिव्हेची भाषाच अधिक परिचित, प्रामाणिक, अपरिहार्य आणि आदरणीय वाटेल. एवढ्याचसाठी आम्ही आत्ताच राजमुद्रांकित आमंत्रणासह हा खड्ग त्यांचेकडे आमचा दूत म्हणून धाडणार! ते संन्यासी आहेत; शस्त्रास बहुधा शिवणार नाहीत. हाय हाय, हे सर्व जरी खरे असले तरी पण निदान काहीतरी मार्ग काढून देण्यास ते कमी करणार नाहीतच नाहीत. निदान शाक्यांस एखादा स्फूर्तिमय संदेश जरी त्यांनी दिला आणि म्हंटले की, "लढा" तरी तो एक शब्द त्यांचे तोंडून सुटताच एखाद्या दिव्य ब्रह्मास्त्रासारखा आमच्या राष्ट्रीय तूणीराची शक्ति अपराजेय करू शकेल! भगवान् बुद्धांचे आशीर्वाद आणि विक्रमसिहांची आज्ञा, दिग्दर्शन, सैन्य, संचालन इतके अप्रत्यक्षच साहय तरी ह्या वेळी ह्या शाक्य धुरंधराकडून शाक्य राष्ट्रांस मिळालेच पाहिजे! मिळेलच. कारण ते दोघेही ह्या शाक्य राष्ट्राचीच संतति आहेत. ह्याच भूमातेच्या अंकावर त्यांनी तिचे स्तनपान केले आहे. आईच्या दुधाची कृतज्ञता त्यांना असलीच पाहिजे. त्यातही ह्या शाक्य राष्ट्रावर हा जो भयानक छापा पडत आहे त्याचे एक कारण हेही आहे की, विद्युद्गर्भ हा बुद्धांचा घोर द्वेष्टा असल्यामुळे बुद्धांच्या जातीचाच मत्सर करू लागून तो तिला मातीस मिळवू इच्छितो! कोण? दूता, काय आहे?

दूत : (प्रवेशून) क्षमा असावी महाराज? राजधानीपासून चार योजनावर आपल्या मुख्य सेनाशिबिरात मोठा गोंधळ माजला आहे. विद्युद्गर्भाचे सैन्य अर्धे राज्य आक्रमून वेगाने पुढे घुसत आहे. वाटेत जो जो शाक्य येईल त्यास कोसलचे सैनिक चराचर कापून काढीत चालतात.

कित्येक गावेच्या गावे जळत आहेत. बायकामुले यांचीही सरसहा शाका होत आहे. मोठा आकान्त झाला. संत्रस्त लोकाच्या झुंडीच्या झुंडी राजधानीकडे जीव घेऊन पळत येताहेत. ह्या बातम्या ऐकताच ह्या सैन्य शिबिराचा धीर सुटला. अलीकडेच सैन्यात भरती करण्यासाठी आम्ही गावोगावी गेलो असता लढणे हे पाप आहे, आपण शस्त्र धरणार नाही, सैनिकांचा धंदा आणि कसायांचा धंदा सारखाच बहिष्कार्य म्हणून धडधडीत लोक आमची निंदा करीत. तरीही जे कसेबसे सैन्यात आले ते सर्व रडतराऊत. ह्या भयंकर बातम्या ऐकून पुढे चाल करून जाण्याची आज्ञा होताच सेनाशिबिरातून उघडपणे शिस्त मोडून मागे फिरले. त्यास रेटण्यास जाताच मोठा गोंधळ उडाला. आजच्या आज ह्याची व्यवस्था न झाली तर..

वल्लभ : आजच्या आज नव्हे या घटकेस. चल ह्या चढत्या स्वारीने मी तिकडे आलोच. महाराज, आपल्या नगरगृहात, त्या आपल्या संथागारात, संकट घंटा वाजू द्या. सर्व नागरिकांस जमवून सर्वाधिकारी नेमावे; राष्ट्रीय संकटाची पूर्ण जाणीव द्यावी आणि नागरिक सैन्य उभारावे. सेनापति विक्रमसिंहाचा काय तो निरोप येईतो मी सैन्यास संघटित करून शत्रूस तोंड देत राहतो. यत्न आपला, यश ईश्वराधीन! स्त्री-पुरुष, संसारी, संन्यासी, शाक्यांच्या बीजाचे असतील ते ते सर्वजण शस्त्र घेऊन उठा. ह्या शाक्य जातीची, ह्या प्राजकाची - या आपल्या राष्ट्राची शपथ आहे! उठा! हा मी चाललो. शाक्य राष्ट्राचा प्रख्यात विगत सेनापति विक्रमसिंहाचा मी पुत्र; मी शाक्य राष्ट्राचा विद्यमान सेनापति आहे; हे ह्यापुढे शत्रूच्या प्रत्ययास आणून देईन तरच नांवाचा वल्लभसिंह!

(जातो.)

(पडदा)

प्रवेश ५ वा

सुलोचना : (माळ ओवीत खालील गाणे गुणगुणते)

(चाल: पडला अभिमन्यू)

माळ गुंफिताना । ऐका कवनाला । गुंफी कोण कशी माला ।। १ ।।
घाली जगदंबा । त्रिगुणातीताला । त्रिगुणी बिल्वदली माला ।। २ ।।
गुंफी प्रकृति देवा । विराटासी । नव नव सूर्यमालिकांसी ।। ३ ।।
प्रलयंकर काली । गुंफि महाकाला । ती नरमुंडचुंड माला ।। ४ ।।
उद्धवा घाली । घाली उद्धवाला । सृष्टि भूकंपांची माला ।। ५ ।।
गुंफि सत्यभामा । श्री हरिला साची । माला पारिजातकांची ।। ६ ।।
माळ मोत्यांची । गुंफी रुचिरा ती । राणी राजाच्यासाठी ।। ७ ।।
फुलांची माळा । माळा ओवि रती । आलिंगि त्या अनंगा ती ।। ८ ।।
विरहिणी परि ती । प्रिय स्मरण काला । ओवी अश्रूंची माला ।। ९ ।।

अजून कसे यायचे नाही बाई! आता मागच्या पायी येतो म्हणून सांगून गेले. जाताना मी जाणूनबुजूनच हसत निरोप दिला नाही. सामोरी हसत येऊन म्हणून मधाच बोट तेवढे लावून ठेवले की त्यायोगे तरी मी रुसल्याचा चटका माझ्या वल्लभास लागून राहील आणि पटकन परत पावली यायचे होईल! (पुन्हा गाणे म्हणते) हे काय, अजून यायचे नाही! माझी वरमाळ पुरी झाली ओवून. अजून यायचच नाही! जा तर नको येऊ, सेनापति व्हायचे आहे ना आताशी. पुरुषांना एखादा अधिकार मिळाल्याची पहिली खूण म्हणजे त्यांना घरात पत्नीशी बोलायला वेळ सांपडेनासा होतो. त्यापेक्षा ते चक्क असे का सांगत नाहीत की हे पहा मी आता मोठा थोर झालो आहे, घरातील यःकश्चित् बायकांशी बोलणे माझ्या योग्यतेच्या खालची गोष्ट आहे. पण ही चुकी बायकांचीच आहे. त्या लघाळीसारख्या जातात कशाला बोलायला? मी तरी आज आता स्वारी आली म्हणजे वचन दिल्याप्रमाणे हसत हसत सामोरी जाणारच नाही. पण सामोरे जावे. थकून भागून येईल माझा वल्लभ. चटकन मुळीच दिसले नाही तर चिंतावेल त्याचे मन. तेव्हा हसत हसत तेवढे सामोर जावे म्हणजे झाले. पण बोलू नये चांगली घटकाभर! (माळ नीट पहात) नको गडे, घटकाभर न बोलणे चांगल नाही. कारण पूजेची वेळ आधीच तोंडाशी आलेली, अबोल्याला देखील घटका कोठली उरायला! एक दहा पांच क्षण आपले ही सोन्याची ताम्हनवाटी उपकरणी लावण्यात गुंतलस दाखवाव. बघूच नये तिकडे, (थोडे थांबून) इश्श, कोणाला कळेल तर लोक हसतील मला. परकर नेसलेल्या मुली जशा आपल्या आपल्या मनाशीच बोलतात नि गट्टी तुट्टी करतात ना तशी काय मी हे मनाशी खेळत आहे! माझे वल्लभ मला अगदी पोरसवदा म्हणतात ते खोटे नाही. पण मी म्हणते सुखांत, संगमात जरी भेटीला मी अधीर झाले, पोरसवदा हसले; रुसले; तरी, दुःखात, संकटात, गंभीर प्रसंगात, अशी अगदी एखाद्या विदुलेसारखी, स्त्री राज्यातील स्त्री सेनानी सारखी ऐटीत नीडरपणे ठाण मांडून त्या प्रसंगी तोंड देत उभी राहिली म्हणजे तर

झाले ना! मग तर ही पोरसवदा पोर अगदी थोरसवदा ठरेल ना! अगदी वल्लभासारख्या थोरांनी देखील स्वयंवराचा सवदा करून आणावी अश्शी थोरसवदा (आरशात पाहत) अगदी शाक्यांची सेनापतीण!

दासी : (प्रवेशून) बाईमहाराज, बाहेर एक सेनापतींकडचा घोडेस्वार आला आहे तो..

सुलोचना : तो नाही, ते म्हण! अग, ओळखल हो मी की सेनापति स्वयमेवच आले आहेत. पण मला फसवून बाहेर आणून सामोरे जाण्याचा मान मजकडून बळेबळे घेण्यासाठी मला फसविण्यात येत आहे की कुणी सैनिक निरोप घेऊन आला आहे म्हणून!

दासी : खरोखर! बाई महाराज

सुलोचना : लुच्चे! माझा पगार घेऊन, मला फसवू पहाणाऱ्या माझ्या शत्रूस सामील झालीस काय! (कमलनालाने मारते.) सेनापतिच आले आहेत. जा, त्यांस सांग की यायची वेळ अजून झाली नाही. आणखी थोड्या विलंबाने यावे!

(चाल - न पयाम आता है-)

समयी सखा न ये । मी जात फसुनी आता गे ।
बघत वाट थकले । मी दारि बसुनि आता गे ।। ध्रु.।।
मानि या आता गोडी गुलाबी पुन्हा ।
सख्याशी मांडिले मी युद्ध रुसुनि आता गे ।। १ ।।
गांठ होतांचि या । शत्रुकंठी पाश हा ।
आलिगनाचा । फेकीने कसुनि आता गे ।। २ ।।
दूति जा सांग । आलात जा तसेची ।
प्रिया रडवीनची । मी हसुनि हसुनि आता गे ।। ३ ।।

दासी : शपथ! स्वामिनी, सेनापति नाहीत. ते एक अत्यंत निकडीच्या संकटाची बातमी आल्यामुळे तसेच राजधानी सोडून सेनाशिबिरास गेले. जाताना धावत्या घोड्यावरून इतके काय ते या सैनिकास सांगितले. मी दोनचार दिवसांत येतो; निदान, सविस्तर वृत्त धाडतो. जा, घरी सांग; तो आहेच दाराशी.

सुलोचना : काय, म्हणतेस तरी काय? (घंटा होतात) आणि हे काय? नगरभवनातील, आपल्या राजधानीतल्या संथागारातील संकटघंटा! संकट कसले? कुठे तो घोडेस्वार? अग, माझ्या वल्लभाला उद्देशून मी आताच, ''आणखी थोड्या विलंबान यावे'' म्हणून विनोदात म्हंटले ते काय आणि ही बोलाफुलाला गांठ पडली ती काय? कशाला मेले मी तसे अशुभ वाक्य रुसव्याने म्हणाले! अग, आज ते जाताना मी त्यांच्याशी धड बोलले देखील नाही थट्टेथट्टेन. (पुन्हा घंटा वाजतात.) चल, चल! त्या मेल्या कोसलच्या विद्युद्गर्भाने तर नसेल ना काही घात केला?

प्रवेश ६ वा

(बुद्धदेव, सेनापति विक्रमसिंह (भिक्षु विक्रम) आणि इतर भिक्षु बसले आहेत.)

विक्रम : शेवटी चाळीस वर्षांपूर्वी मला वाटलेली भीति अशी खरी ठरली! केवळ दयेने दुष्टता, केवळ कारुण्याने क्रोध, केवळ अहिंसेने हत्या, केवळ शास्त्राने शस्त्रे सदोदित आणि सर्वत्र वशीभूत होत नाहीत, जिंकली जात नाहीत, नष्ट करिता येत नाहीत! हेच कठोर सत्य शेवटी आपल्या डोळ्यांदेखत प्रत्ययास आले ना? भगवन् जन्म, व्याधि, जरा आणि मृत्यूपासून मनुष्यमात्रास विनिर्मुक्त करण्यासाठी मनुष्यात जर कुणी अधिकांत अधिक त्याग केला असेल, तप केले असेल, चिंता वाहिली असेल तरी ती तथागत, भगवन् बुद्धदेव, आपण होय. त्रिविध तापांचा अशेष नाश करण्याचा ज्या आर्यपंथाचा आपण आविष्कार केलात, तृष्णानाश केला असता मनुष्य जन्मपरंपरेच्या कैचीतून सुटून मुक्त होतो हे जे आपण तात्विक निदान ठरविलेत त्यावर आणि आपल्या पारलौकिक स्वरूपाच्या मुक्तीवर ज्यांचा विश्वास बसत नाही ते ऐहिकवादी लोकही आपले एवढ्यासाठी स्वभावकौतुकच करितील, सादर कृतज्ञच राहतील की निदान ह्या जन्मी, ह्या आयुष्यात तरी जन्मव्याधिजरामृत्यु ह्या चारी संकटांपासून दैहिकतः ही मुक्त; अक्षरशः पूर्ण मुक्त करणे, मनुष्याचे हातात नाही; एवढ तरी आपण सिद्ध केलेतच! कितीही दुःखमय असले तरी बद्धास वा बुद्धास ह्याच जगात देह आहे तोवर राहिलेच पाहिजे आणि जगात आहो तो भौतिक अर्थी तरी ह्या चारी आधीव्याधींना मनुष्यमात्रास मग तो पारलौकिक अर्थी बद्ध असो; मुक्त असो- तोंड देलेच पाहिजे हे कठोर सत्य आता संशयास्पद आहे असे म्हणण्याची मानवी आशेची हिंमत पुन्हा होणार नाही. मनुष्यप्रयत्नांची आपण शेवटची पराकाष्ठा केलीत आणि निसर्गशक्तीपुढे मनुष्याच्या यत्नान हात टेकले. हाही काही थोडा लाभ झाला नाही. असला पराजयही आंशिक जयचे होय. जे जे अपरिहार्य म्हणून ठरेल त्यास तोंड देण्यास जो शूर आहे तो आपल्या अल्लड इच्छांच्या अश्रूंतच गटांगळ्या खात न बसता दंड थोपटून सज्ज असतो. आता जर ह्या भौतिक अस्तित्वात तरी जन्म, व्याधि, जरा मृत्यु ह्या चार शत्रूस तोंड देलेच पाहिजे, तर मग त्या भौतिक शक्तींशी द्याव्या लागणाऱ्या झुंजीत स्वपक्षास कमीत कमी हानि होऊन अधिकात अधिक लाभ ज्या प्रकारे होईल अशीच युद्धनीती मनुष्यान अवलंबन केली पाहिजे. माझ्या मते ती युद्धनीति म्हणजे मनुष्य जातीच अधिकांत अधिक सुख साधण्यात किंवा पाहिजे तर असे म्हणा की, तिचे दुःख कमीत कमी कारण्यास्तव संसारिक सर्व कामें यथावत् करणारा कर्मयोग हीच होय. आपल्या मते संसारीक कामिनी, कृषि, कृपाण ह्या तिन्ही वस्तूंचा आंत्यंतिक त्याग करणारा कर्मसंन्यास हाच मरेतो जगण्याचा उत्तम मार्ग होय. परंतु आता अनुभवानेच सिद्ध झाले नाही का की, त्या तिन्ही त्यागांतही आंत्यंतिक शस्त्रत्यागाची प्रतिज्ञा तरी लोकहितास अत्यंत बाधक होते. कारण आपल्या सारख्यांचा शस्त्रत्यागाचा हा उद्दात्त उपदेश सत्प्रवृत्त लोकच पाळणार. तदनुसार ते केवळ दया, अहिंसा, क्षमा ह्या भावनांच्या आधारावर जगू पाहणार; आणि मुख्यतः, दुष्ट, दुर्जनच आपल्या उपदेशास लाथाडून शस्त्राने, शक्तीने, बळाने कुरघोडी करू पाहणार. अशा

सामन्यांत पोथीच्या पानांची पोचट ढाल पक्क्या पोलादाच्या आघाताखाली पिचून पिचून जाऊन पुण्यशीलांचा विनाश आणि पापशीलांचा विजय होणारच होणार; हे भाकित जे मी चाळीस वर्षांपूर्वी केले ते आज सत्य होत आहे की नाही पहा. हे मी आनंदान म्हणत नाही; अत्यंत दुःखाने म्हणत आहे. माझे हे अनिष्ट भविष्य खोटे ठरावे म्हणून तर मी माझ्या इच्छेविरुद्ध आपल्या म्हणण्याप्रमाणे शस्त्रसंन्यास करून भिक्षुधर्माच आपल्या आज्ञेनुसार तंतोतंत पालन करीत आलो. पण शेवटी शस्त्रयुद्धे शांतिमय जगातून नाहीशी होण्याचे स्थली त्या शस्त्र-युद्धांच्या रणधुमाळीत ह्या जगातून ती शांतिच नामशेष होण्याची पाळी आली. एक बाजूस मगधाचा राजा बिंबिसार आपला शिष्य झाला, क्षमेचा आणि अहिंसेचा भोक्ता झाला; पण त्याचा पोटचा पुत्र अजातशत्रू आपला द्वेष्टा झाला; बापाविरुद्ध त्याने बंड केले, आणि बापास ठार मारून तो सिंहासनावर आमच्या सर्वांच्या छातीवर विराजमान झालेला आहे. ही मगधाची बातमी जुनी होते न होते तो ही कोसलची बातमी येऊन थडकली की, विद्युद्गर्भानेही आपल्या पित्यास मरणाचे दारी ढकलून राज्यश्रीस दडपले. तो पिताही, कोसलाचा तो प्रसेनजित् महाराजही आपला शिष्य, आपल्या दया, शांति, आहिंसेचा भोक्ता! पण त्या आपल्या उपदेशाचा परिणाम त्याच्याच पुत्रावर ह्या विद्युद्गर्भावर लवलेशही न होऊन तो झाला आपला कट्टर द्वेष्टा! त्याने, त्या दुष्ट पुत्राने, शस्त्रशक्तीच्या आधारावर बंड केले आणि तो सुष्ट पिता, शस्त्रसंन्यासाचा अभिमानी, त्या बंडात जीव घेऊन पळत असता, मृत्युमुखी पडला. ज्यांनी ज्यांनी आपला उपदेश ऐकला ते ते सुष्ट, राजा बिबिसार, राजा प्रसेनजित् आणि हे शाक्य मारले गेले जाण्याच्या पंथास लागले आणि जे जे तो उपदेश न ऐकता शस्त्रालाच शास्त्रासमान पूजित राहिले ते ते दुष्ट भरभराटले. शेवटी निर्बल कारुण्याला क्रोधाने मारिले; दुबळ्या दयेचा प्राण दुष्टतेने घेतला.

बुद्ध : भिक्षु विक्रमसिंह! ह्या माझ्या संन्यस्तसंघाचेमुळे आजवर लोककल्याण असे काहीच साधल नाही असे का आपले म्हणणे आहे?

विक्रम : भगवन्, ह्या संन्यस्तसंघानेच नव्हे, तर संन्यास आश्रमानेही जीवमात्रावर जे उपकार केले आहेत त्याला पारावार नाही. अहो, सर्वसंगपरित्याग करून वनामध्ये संन्यासी जो शब्द बोले ते उभ्या मानवाचे शास्त्र होत आलेले आहे, ‘धर्मोहि विश्वस्य प्रतिष्ठा’ हे वाक्य तथ्य आहे. पण हे वाक्यही अगदीच अतथ्य होणार नाही की, ‘संन्यासो हि धर्मस्य प्रतिष्ठा’ इतक्या थोर थोर विभूतींच्या पदस्पर्शाने हा संन्यासाश्रम स्वर्गासमान पूज्य झाला आहे. आपल्या ह्या संघाचीच गोष्ट घेतली तरी म्हणजेच आपली गोष्ट घेतली तरी, आज चाळीस वर्षे भगवन् आपल्या ह्या अत्यंत सरळ, सोप्या आणि करुणामय शीतळ धर्मोपदेशामृतामुळे सहस्त्रावधि जीवांची तळमळ शांत झाली आहे. यज्ञांच वैयर्थ्य आपण सिद्ध करून शेकडो उपयुक्त जीवांस जीवदान देलेत; देवदेवतांच काल्पनिक बंड मोडून टाकून सदाचरण आणि लोकप्रेम हेच खरे धर्मसाधन म्हणून स्थापित केलंत. आपले भिक्षु गावोगाव जाऊन रोग्यांची सेवा करितात, अडल्यांची सुटका करितात, परस्परांचा मत्सर करू नका, अन्योन्यी दया करा, अपराध क्षमा करा, इत्यादि उदात्त उपदेश

करीत घरोघर समाधानाचा शीतल संदेश पोचवितात, हे आपले उपकार, हे दयामय देवा, जगत् कधीही फेडू शकणार नाही. परंतु आपल्यासारख्या महान् विभूतींच्या चाळीस वर्षांच्या अत्यंत उत्कट विशुद्ध प्रयत्नांनीही, 'शस्त्रबळाची उपेक्षा हानिकारक आहे', हे सत्य असिद्ध झाले नाही. पण हे सकृद्दर्शनी भासणार अपयशच त्या त्या प्रयत्नांचा यशस्वी परिणाम होय.

आनंद : (प्रवेशून) बुद्धं सरणं गच्छामि, धम्मम् सरणं गच्छामि, संघं सरणं गच्छामि. भगवन्! शाक्यगणतंत्राचे वतीने त्यांचा प्रत्यक्ष राजप्रतिनिधि तथागत बुद्धांची आणि भिक्षुवर विक्रमाची भेट घेण्यास आला असून त्याने अशी अत्यंत दुःखकारक बातमी आणली आहे की, कोसलचा राजा विद्युद्गर्भ ह्याने असावध अशा शाक्य प्राजकावर एकाएकी स्वारी करून त्याची अगदी धूळधाण उडविली आहे.

विक्रम : काय शेवटी या थरावर गोष्ट आलीच ना! आनंद! जा जा, त्या शाक्य राजदूताला बुद्ध भगवानांचे समीप घेऊन या, या (आनंद जातो.) भगवन्, पाहिलेत ना! आपल्या आत्यंतिक अहिंसामय उपदेशाने काही व्यक्ति करुणामय बनतील, पण सर्व शक्ति तशा बनू शकणार नाहीत. प्रत्यक्ष आपल्या दैदीप्यमान उपस्थितीत जर जगाची ही स्थिति तर आपला अवतार अस्तंगत झाल्यावरची कथाच काढावयास नको. क्रूर प्रवृत्तीचे असुर ह्या जगात व्यक्तिरूपे आणि राष्ट्ररूपे राहणारच. हे व्यवहारतः प्रत्ययास येतच आहे. तत्वतःही ही उभी पिढीची पिढी जरी आपण संन्यस्त करून सोडू शकू असे आपण गृहीत धरले तरी जे कोटिकोटि जीव पुढील पिढीत जन्म घेणार त्यांची पूर्वसंचित कर्मे भिन्न असल्यामुळे त्यांची उपजत प्रवृत्तिही परस्पर विभिन्नच असणार आणि म्हणून एकाच उपदेशापायी कोणी दयाशील होऊ शकेल तर कोणी होऊ शकणार नाही. कारण त्या कोट्यवधि जीवांच्या मनोविकासाच्या कोट्यवधि परंपरा असणारच, एतदर्थ दयेने द्रवतील तर ठीकच, पण जे दुष्ट तसे वळणारच नाहीत त्यास दंडाने, बळाने त्या परोपद्रवी दुष्टतेपासून परावृत्त केले पाहिजे. जसे पिसाळलेल्या कुत्र्यास आपण दंडाने परावृत्त करणे हीच खरी भूतदया समजतो. अधिकांत अधिक सुष्ट प्राण्यांचे हितार्थ एका दुष्ट प्राण्यास दंडिणे हाच खरा धर्म समजतो. हिंसेची दंत, नखे शस्त्राने छाटून टाकते तीच अहिंसा होय.!

शाक्य राजदूत : (प्रवेशून) बुद्धं सरणं गच्छमि, धम्मम् सरणं गच्छामि, संघं सरणं गच्छामि. भगवान् शाक्य राष्ट्राच्या जिवावरच जे संकट आले आहे ते इतके असह आहे आणि जो संदेश मी आपणांकडे आणीत आहे तो इतका त्वर्य आहे की, आपल्या प्रश्नांचीही अपेक्षा न करिता ते सर्व आपण होऊनच मला सांगून टाकावे लागते आहे. सेनापति विक्रमसिंह, शाक्यांवर कोसलाचा क्रूर राजा विद्युद्गर्भ विजेसारखा कोसळून पडला आहे. स्वसैन्य वाताहत झाले आहे. एकच वीर तेवढा अजूनही न डगमगता रणांत विद्युद्गर्भास अडवून उभा आहे- तो म्हणजे, विक्रमसिंह, आपला पुत्र वल्लभसिंह, आणि मरणासन्न शाक्य राष्ट्राच्या हृदयात जीवनदायी अशी अजून एकच आशा, एकच धुगधुगी उरलेली आहे ती म्हणजे हे शाक्यांच्या धुरंधर सेनापती, हे वीरवर, हे शाक्य राष्ट्रपितामह- तुमचे साहाय्य आणि भगवान् बुद्धदेवांचे आशीर्वाद! आमची अशी प्रार्थना आहे की,

आमच्या विक्रमसिंहानी जो संन्यासाश्रम स्वीकारला आहे त्यास आमची ही विनंती विसंगत असताही शाक्य राष्ट्राच्या प्राणांतिक संकटी त्याची मुक्तता करण्यासाठी विक्रमसिंह, आपण गजेंद्रासारखे धावून यावे, श्रीकृष्णांसारखा प्रतिज्ञाभंगही उचितकाली आर्तपरित्राणार्थ तरी उचितच समजावा. विद्युद्गर्भाला जिंकले नाही तर हे शाक्य राष्ट्र नष्ट झाल्यावाचून रहात नाही. आणि विद्युद्गर्भाला जिंकण्याला आपणच एक वीर समर्थ आहा.

बुद्ध : राजदूत! तू शाक्य राष्ट्राला आमचा निरोप कळीव की, तुमच्या दुःखाने तथागतास फार दुःख होत आहे. परंतु तितकेच दुःख विद्युतद्गर्भ आणि त्यांचे कोसलीय सैन्य यांच्या दुःखाविषयीही होत आहे. कारण तुम्ही त्यांच्या छळाच्या आणि अत्याचाराच्या आगीत पोळत आहा तर ते छळक संतापाच्या आणि अतितृष्ण मत्सराचे आगीने भाजत आहेत. आम्हांस दोघेही सारखेच. दोघेही वैर सोडा हेच आमचे अनुशासन!

विक्रम : अहो, पण ज्या दुष्टाने वैर धरले, त्याने ते सोडले पाहिजे ना! उद्या ह्या पीठाचे वतीने जगांतील वाघ जातीलाही आदेश धाडावा की, परवापासून गायगुरांचे वैर सोडा! तो आदेश वाघाकडून जेव्हा पाळला जाईल तेव्हा देखील आपणांस असे आढळून येईल की, वैर सोडण्याचा आदेश मनुष्यातील दुष्ट, दुर्जन पाळण्यास सिद्ध नाहीत! म्हणून अशा दुष्टांचे दमन दंडानेच केले पाहिजे.

बुद्ध : पण जे दमन दंडाने होत ते स्थायी नसते. मनच दुष्टतेपासून परावृत्त करणे हा दुष्टांस सुष्ट करण्याचा उत्तम मार्ग नव्हे काय?

विक्रम : तो एक कल्पनेच्या पोकळीतील उत्तम मार्ग असेल! जसे मेल्यावर मिळणार स्वर्गातील अमृत तृष्णाशमनास अगदी उत्तम; पण ह्या सतृष्ण जगाच्या तान्हेल्या जीवांस गावच्या टेकडीवरील उड्या टाकीत येणाऱ्या लहान ओढ्याचे ओंजळभर गोड पाणीच अधिक शीतलता देत. काव्यांत कल्पवृक्ष मोठा उत्तम; पण प्रत्यक्ष उन्हात अगदी साध्या बिचाऱ्या वडपिपळांचाच उपयोग त्यापेक्षा शतपट अधिक होतो! आणि दुसर असे की दुष्टाचे मन सदुपदेश ऐकण्याच्या सत्प्रवृत्त स्थितीत आणण्यासच दंडशक्तीची मात्रा बहुधा पहिला रामबाण उपाय असतो. आपला चाळीस वर्षांचा अनुभव हेच सांगतो की, दुष्टतेची एक स्थिति अशी आहे की ती प्रत्यक्ष बुद्धाच्याही साधुवादाने असाधुत्व सोडीत नाही. विद्युद्गर्भ हा तसाच एक दुष्ट आहे; म्हणून त्याचे मन दंडाने वळविता जरी आले नाही तरीही ते पंगु करून टाकिता येतेच येते. पण नुसत्या उपदेशाने तात्कालिक लाभही होत नाही; स्थायी तर होत नाहीच नाही. त्याच्या क्रोधाची नखे छाटली, दंत उपटले तर मग तो नुसताच स्वतः जळफळत पडला, शांत झाला नाही तरीही हा लोक तरी त्याप्रमाणे त्याच्या प्राणघातक रक्तपी हावेपासून मुक्त होऊन निर्भय शांति भोगू शकेल.

बुद्ध : भिक्षुप्रवर विक्रम, आपल्या ह्या भाषणातील मर्म मी ओळखून आहे. पण आम्ही संन्यस्तकाम संन्यासी, संन्यास धर्म अहिंसेचा पुरस्कर्ता, तथापि आपण म्हणता त्याप्रमाणे ज्या अर्थी आत्यंतिक अहिंसा ही आचरणे मनुष्यास केवळ अशक्य आहे आणि ज्या अर्थी प्रबळ अशा

दुष्ट दुर्जनांनी तिचा अवलंब करण्याच्या आधीच केवळ सुष्ट सुजनांनीच काय तो तिचा आत्यंतिक अवलंब केला असता अशी असमय अहिंसा केव्हा केव्हा हिंसेअतकीच लोकघातक होऊ शकते हे आपले विधेय अखंडनीय आहे, नाकारताच येणार नाही, त्या अर्थी आम्ही ह्यापुढे असे अनुशासन देतो की, न्याय्य युद्धांत आततायी शत्रूंशी लढण्यासाठी शस्त्रधारण करण्यास माझ्या गृहस्थाश्रमीय अनुयायांस माझी अनुज्ञा आहे. एतदर्थ शाक्य राष्ट्राने ह्या असुधारणीय विद्युद्गर्भाच्या ह्या अत्याचारी आक्रमणाचा प्रतिकार करण्यासाठी शस्त्रधारण अवश्यमेव करावे. त्या हिंसेचे पाप त्या सदाचारी प्रतिकाऱ्यांवर नसून त्या अत्याचारी अनुयायांवर आहे, मन्युस्तन् मन्युमृच्छति. हे राजदूता, जा आणि ही माझी अनुज्ञा शाक्यांस कळवः ह्या धर्मयुद्धात तुमच्या असिलतेला माझे आशीर्वाद सहाय्यक होवोत!

राजदूत : भगवन्! आपल्या आशीर्वादाविषयी उभे शाक्य राष्ट्र आपले अत्यंत आभारी आहे. आता ज्या शाक्य असिलतेला सहाय्यक व्हावयासाठी आपण हे दैवी आशीर्वाद मला दिलेत ती शाक्यांची असिलताही तेवढी मला भगवानांनी अर्पण करावी की हा राजदूत मागले पायी शाक्यांकडे परतलाच! होय, ती शाक्यांची असिलता आपल्याच चरणापाशी आज चाळीस वर्षे कोशबद्ध होऊन पडलेली आहे.

बुद्ध : शाक्यांची कोशबद्ध असिलता? कुठे आहे? इथे?

राजदूत : होय भगवन्! ही पहा इथे! ह्या शाक्य सेनापतीच्या देहकोशात गुप्तीसारखी गुप्तपणे निवसत असलेली वीरता- हीच आमच्या शाक्यांची राष्ट्रीय असिलता आहे! भगवन्, तिला तेवढी आता आमच्या हाती द्या. ह्या खड्गहस्त सेनापति विक्रमसिंहाचे समरशृंग रणांगणात फुंकल जाताच शाक्यांच्या रानातील कोल्हेही सिंह होतील!

बुद्ध : म्हणजे, भिक्षुवर विक्रमांनी तलवार उपसावी? संन्याशाने आपल्या वस्त्रांस, रक्तांत, भिजवून ती भगवी करावी? अशक्य! राजदूत, आम्ही संन्यासी, विरक्त, समदर्शी, आम्हांस तुमच्या सांसारिक वादविवादात पडावयाच नाही. आम्हांस तुम्ही सर्वच सारखे. संन्याशाने शस्त्र उपसून माणसाच्या शाका करीत सुटाव आणि आम्ही त्यास अनुमोदन द्यावे हे तुम्हांस विचारवले तरी कसे? आत्यंतिक ब्रह्मचर्य आणि आत्यंतिक शस्त्रत्याग ह्या तर संन्यस्त भिक्षुधर्माच्या दोन मूलभूत प्रतिज्ञा आहेत. त्या कशा तोडल्या जाणार?

विक्रम : क्षमा करा! किंवा करू नका. पण भगवन् मला हे तुम्हास सांगितलंच पाहिजे की, सांसारिक वादात जर संन्याशाने, विरक्ताने पडावयाच नसेल, जर आम्ही न्यायी नि अन्यायी दोघांनाही सारखंच मानावयाच असेल तर तथागत बुद्धांच्या ह्या अनुशासनाचा अधिकांत अधिक भंग करणारा अपराधी म्हणजे तथागत बुद्धच ठरतील. भगवन् आपण पूर्वी राजगृही असताना तेथे एक शेकडो जीवास मारणारा यज्ञ होणार होता. तो बलिदानाचा कळप वाटेन चालत असता त्यातील एक लहानसे कोकरू लंगडत चाललेले आपणांस दिसले. आपणांस ते पाहताच इतकी दया आली की, त्या कोकरास आपण स्वतः कडेवर घेऊन त्या कळपामागोमाग राजयज्ञागारी गेलात,

विप्रांशी वादविवाद करून यज्ञात जीवहिंसा करणे पाप आहे असे आपण त्यांस पटविलेत आणि कोकरासुद्धा सर्वांची मुक्तता केलीत. एका कोकराच्या, शंभर पशूंच्या हिंसेस वाचविण्यासाठी आपण संन्यस्त कर्माचे मुकुटमणिही सांसारिक वादविवादात भाग घेते झालेत, आणि येथे शेकडो अर्भक मुलांच्या, शेकडो अनाथ कन्यांच्या, हजारो निरपराध माणसांच्या प्राणाशी बेतली असता आपण म्हणता सांसारिक वादात संन्याशास पडता येत नाही! म्हणे संन्याशास शाक्य आणि विद्‌यद्‌गर्भ दोघेही सारखेच. समबुद्धि हा संन्यासाचा धर्म! परंतु संन्यासी भिक्षु चोयट्या सोलून ऊस खातात, भूस फुंकून तांदूळ खातात, गढूळ डबके सोडून चांगल्या वहात्या नदीच पाणी पितात. दुभत्या गाईच्या कासेत हात घालतात, सापाचे बिळात हात घालीत नाहीत. मध जरी खातात तरी विषारी मधमाशांची पोळी आपल्या काखेत लागू देत नाहीत. तेव्हा चांगले आणि वाईट आम्ही ओळखतो.
बुद्ध : मग अशा समयी संन्याशाने काय करावे असे आपले मत आहे?
विक्रम : काय करावे? गायीची मान जबड्यात धरणाऱ्या वाघापुढे धम्म पदाच एकही अनुष्टुप न गाता, कारण ते अनुष्टुप पुर होण्याच्या आधीच त्या गायीचा कंठनाल चिरून तो व्याघ्र तिचे रक्त घटघटा पिऊनही गेलेला असेल!, एका झडपेसरशी खड्‌गाने त्या वाघाचे मस्तक छाटून टाकले पाहिजे! तसेच ह्या दुष्ट विद्‌युद्‌गर्भाच्या सैन्यावर तत्काळ कोणाही इतर संसारी सैनिकापेक्षा अधिक निकराची चाल करून जाऊन त्यास खऱ्या संन्याशाने अवश्य तर ठार केले पाहिजे. आणि निरपराध सहस्त्रावधी शाक्यांच्या बायका-मुलांस जीवदान दिले पाहिजे. स्वर्गप्राप्तीच्या वेडापायी पशुहत्या चालू देणे हे जर संन्यस्त भिक्षुस निर्दयपणाच, आहे; तर अहिंसेच्या खुळापायी ही नरहिंसा चालू देणे त्याहूनही शतपट निर्दयपणाच संन्यासित्वास कलंक लावणार नाही काय? भगवन्, मला समरात उतरू द्या. माझ्यात अजूनही दुष्टांचे शासन करण्याची शक्ति आहे. निदान त्याचे ह्यापुढील क्रौर्य तरी पंगु करीनच करीन. निरपराध्यांची पुढील घोर हिंसा तरी टाळीनच टाळीन. नव्हे क्वचित् अजूनही त्या अत्याचारावर शाक्य राष्ट्र विजयही मिळवू शकेल!
बुद्ध : तरी काय? आज शाक्यांवर विद्‌युद्‌गर्भ जय मिळवीत आहे. उद्या शाक्य त्यांच्यावर जय मिळवितील. तरी काय? जयाने ते वैर तसेच पुढे चालणार! जो पराजित होईल तो दुःखीच राहाणार. म्हणून जो खरा संन्यस्तकाम आहे, खरा उपसन्त, शांत आहे तो ह्या जयापजयाच्या दोन्ही गोष्टी सोडून स्वस्थ झोप घेतोः

"जयो वैर प्रसवति दुःखे शेते पराजितः ।
उपसन्तः सुखे शेते हित्वा जयपराजयम् ।।

विक्रम : हाय, हाय! हे मी काय ऐकत आहे! भगवन्, आपल्या स्वतःला जेव्हा वाटले की आपण निर्वाणपदी पोचलात त्यानंतरही केवळ दुःखतप्त जगास पाहून आपणांस आलेल्या कळवळ्यामुळे लोककल्याणार्थ आपण हा देह चालविलात तो काय ह्या वचनाच्या आधारे? केवळ सुखे शेते! - सुखाने झोपतो इतकाच संन्यासाचा मुख्य गुण? तर मग आपण निर्वाणपदी केव्हाच झोपा काढावयाच्या होत्यात. देहत्याग करावयाचा होता. सुखे शेते ह्याचा लाक्षणिक अर्थ आपणांस

अभिप्रेत असेल तर मग ती स्थितप्रज्ञता, कर्मफलाचा अंतस्त्याग, शस्त्र-संन्यासाप्रमाणे शस्त्रधारणातही शक्य आहे, काटा काढावयास संन्यासी सुई घेतोच की नाही? मग खलकंटक काढावयास खड्ग का घेऊ नये? दहा कोसांवर कोणास काटा मोडला तर तुमचे अंतःकरण कळवळत आणि त्यास औषध देण्यास जाता तेव्हा आपली झोपमोड लाक्षणिक वा तात्विक अर्थी नसली तरी अक्षरशः होत नाही काय? आपण म्हणता जय वैरास प्रसवतो आणि पराजित अन्याय दुःखी होतो; ते काही अंशी खरे आहे. पण अन्यायी मनुष्यास पराजयाचे जे दुःख होत ते टाळण्यासाठी न्यायाचा पराजय करून घ्यावयाचा काय? चोरास चोरी फसल्याचे दुःख होऊ नये म्हणून सावांना घराची दार उघडी टाकणे भाग पाडायचे? का ते पराजयाचे दुःख अन्याय्य कर्माची शिक्षा म्हणून त्या दुष्टास भोगणे प्राप्त होणेच श्रेयस्कर मानावयाचे? अन्यायी आततायांस पराजयाचे दुःख होत ते वाईटच; पण जर दुर्जनांचा उद्दंड अन्याय तसाच चालू दिला तर निरपराध सुजनांच्या छळान अवधी मनुष्य जाति संत्रस्त आणि दुःखी होते त्याची वाट काय? ते त्याहून सहस्त्रपट वाईट आहे! त्यातही दुष्टांस जे दंडाच प्रायश्चित मिळत तेच त्यांच्यातील दुष्टाई करण्याच्या प्रवृत्तीस प्रथम भयाचा आळा घालते. आणि ती अशी पंगू झाली म्हणजे सदुपदेशाने वा संवयीने ती नष्ट होऊ शकते. परदुःख हे केव्हा केव्हा परकल्याणाच अपरिहार्य मूल्य असते. आपण संसार सोडलात तेव्हा यशोधरेला केवढे दुःख झाले; पण पिता वा पत्नी ह्यांच्या दुःखासाठी आपण परत घरी गेला नाहीत, जे तरुण वा तरुणी ह्यांना संन्यस्त दीक्षा देऊन आपण संघात घेतलेत त्यांच्या त्यांच्या घरी रडारड चालू होते. ह्यास्तव कित्येक नगरांनी आपल्यावर बहिष्कार घालून आपणांस काढून लावले. देवदत्ताने नवीन पंथ काढला; आपण विरोध केलात त्यामुळे तो दुःखी झाला, क्रुद्ध झाला. वैर इतके वाढले की आपल्यावर मारेकरी घातले. पण आपण त्याचा पंथ स्वीकारून आपला बुद्ध संघ देवदत्ताच्या दुःखास्तव वा ते वैर तिथेच थांबविण्यासाठी विसर्जन केला नाहीत. कारण हेच ना की लोककल्याणार्थ देवदत्ताच दुःख आणि वाढत वैर हे अपरिहार्य मूल्य होत. अपराध्याच दुःख टाळणे म्हणजे लाखो निरपराधी लोकास दुःखी ठेवणे होते तर मग तोच न्याय संन्याशाच्या शस्त्रधारणासही का लागू नये? ज्या राष्ट्रांचे अन्न खाऊन हा संन्यासाचा पिड प्रतिदिन पोसला जात आहे त्या राष्ट्रावर एक अत्यंत उद्दंड प्रत्यक्ष आपल्या बापासही राज्यासाठी मारू मागे न घेणारा हा राक्षस सहस्त्रावधि सैनिकांनिशी चालून आला आहे, अशा वेळी एका तरवारीच्या झटक्यासरशी तो राक्षस मारणे शक्य आहे असे वाटत असताही जो संन्यासी आपली झोप बिघडू नये म्हणून तो खड्ग सावरण्याचे सोडून आपले पांघरूण सावरू पाहतो; आपल्या राष्ट्रांतील लाखों स्त्रीबाल-वृद्ध भोसकले जात असता त्यांच्या कर्कश किंकाळ्यांनी झोप मोडू नये म्हणून कानांत निरर्थक आणि अनर्थक प्रतिज्ञांचे बोळे घालून 'सुखे शेते' स्वस्थ घोरत पडतो, त्या संन्यासास शतवार धिक्कार असो! सहस्त्रवार धिक्कार असो! सुखे शेते! केवळ स्वस्थ घोरत पडणे हे का उपसंताचे संन्यासाचे ध्येय आहे? ते अजगरांचे ध्येय असू शकेल, आळशांचे असू शकेल, आप्पलपोट्यांचे असू शकेल! संन्याशांचे नव्हे! तेव्हा भगवन् मला आज्ञा द्यावी.

म्हणा, आधीच शाक्यांच्या आशेची आणि आयुष्याची घटिका मोजावयास घातली आहे. तेव्हा विलंब न करता म्हणा, ''जा'' आणि मी गरुडासारखी झेप घेऊन कोसलच्या त्या अत्युग्र भुजंगाचे शाक्यांच्या प्राणास पडलेले भयंकर विळखे तोडून फोडून विच्छिन्न करून टाकतो. पहाः पण, पण दंश होण्याचे आधी मला तेथे पोचू द्या. म्हणा, ''जा''!

बुद्ध : भिक्षुवर विक्रम, आपल्यासारख्या तत्वज्ञानी संन्यस्त भिक्षुने असे एकाएकी उत्तेजित होऊन उठावे, हे आश्चर्य आहे. काही झाले तरी मला तुम्हांला आमच्या संघाच्या प्रमुखतम भिक्षूला शस्त्रयुद्धात शस्त्र घेऊन जा, लढा; असे सांगणे शक्य नाही. संघाची आणि संन्यासाची मूल भित्तीच ज्या काही प्रतिज्ञांवर अवलंबून आहे त्यांतील आत्यंतिक शस्त्रसंन्यासाची ही शपथ कोणाही भिक्षूला मी तोडू देणार नाही.

विक्रम : दुर्दैव राष्ट्राचे की ज्यात हा दुबळा संन्यासधर्मच सर्वोच्च धर्म समजला जाईल! दुसरे काय? शाक्य दूतहो जा आणि राजसभेत सांगा की अदूरदर्शीपणाने आत्यंतिक शस्त्रसंन्यासाची प्रतिज्ञा करणे ही चूक झाली म्हणून तीमुळे लोककल्याणास अत्यंत हानि पोचत आहे असे स्पष्ट झाले असताही ती चूक स्वतःच्या दृढनिश्चयाचे स्तोम माजविण्यासाठी सुधारण्यास नाकारणे म्हणजे दृढनिश्चय नसून केवळ दुराग्रह आहे, असे विक्रमसिंहास वाटते असताही बुद्ध भगवानांची अनुज्ञा नसल्यामुळे त्यांची स्थिति एखाद्या मंत्रबद्ध नागासारखी झाली आहे. त्यांस असे मर्यादेबाहेर हलता येत नाही. शाक्यांच्या रक्षणार्थ खड्ग निष्कोषित करून समरात शिरण्यास उद्युक्त असताही तुमच्या साहाय्यार्थ मला येता येत ...

राजदूत : हा, हा! ते अशुभ वाक्य, तो निर्दय निर्णय, ती राष्ट्रघातक अर्थव्यक्ति पुरी करण्याचे आधी एक पळभर तरी थांबा! बुद्धदेवांच्या इच्छेचा शेवटचा शब्द आपण एका श्रवणाने ऐकलात, पण त्याचे बरोबरच ह्या आर्त, त्रस्त, मरणोन्मुख शाक्य राष्ट्राचाही शेवटचा शब्द दुसऱ्या श्रवणाने ऐका आणि मग तुमच्या त्या निर्णायक वाक्याचा शेवटचा शब्द बोला! शाक्य राष्ट्राच्या आत्म्याची ह्या भयानक संकटातील तळमळ, जिवाची तगमग, त्याच्या शेवटच्या आशेचा तो शेवटचा शब्द व्यक्तविण्याचे सामर्थ्य कोणाही एका व्यक्तीच्या जिव्हेत असणे शक्य नसल्याने शाक्य जातीची ही जातीय जिव्हाच आपल्यापुढे ती राष्ट्रीय करुणा भाकील! (विक्रमसिंहाचा खड्ग काढून त्याजपुढे ठेवतो.)

विक्रम : (दचकून) काय? हा माझा खड्ग! हे माझे कृपाण! चाळीस वर्षे होतील मी संन्यास घेतला, तेव्हा हा मी खाली ठेवला! ह्या खड्गाने मी बारा वेळा शत्रूस धूळ चारली आहे.

राजदूत : सेनापति, त्याच्या मुठीवर त्या बारा विजयांचे स्मारक म्हणून बारा रत्नांचा जडाव चढवून हा आपला खड्ग आमची राष्ट्रीय मत्ता म्हणून आमच्या राजसभेत आम्ही शाक्य सदा लटकत ठेवीत असतो. प्रत्येक नवा सेनापति ह्याला वंदन करून आपले पद स्वीकारतो. तो हा खड्ग! शाक्यांनी ह्या खड्गास आमचा प्रतिनिधी म्हणून आपणांस आमचा संदेश देण्यास, आमची प्रार्थना ऐकविण्यासाठी आणि मन वळविण्यासाठी धाडलेला आहे. शाक्य राष्ट्र जर आता मरणेच

असेल तर निदान वीरोचित प्रतिकार करीत तरी मरावे; पण तेही आता आपण हा खड्ग उचलून रणात अगदी त्वरित उतराल तरच शक्य! महाराज, क्षणभर मी जो प्रकार पहात आलो तो डोळ्यांसमोर आणा. ती आमांपल्ली, केदनावती, लींबणीय कोसलाच्या सैन्यांनी लावलेल्या आगीत गावेची गावे भडकत आहेत पहा! कडाकडा मोडून पडणाऱ्या पेटलेल्या बहालांच्या आणि छपरांच्या खाली म्हातारे आणि मुले जिवंत दबून जळून जात आहेत ते पहा! त्यांच्या मांसाचा तो उग्र वास कोस कोस पसरत आहे! मारा, हाणा करीत कोसलचे शेकडो सैनिक नागव्या तलवारी घेऊन भेटेल त्या शाक्यास सपासप कापीत, लुटीत, ठेचीत धावत आहेत. पहा! त्या स्त्रियांच्या थव्यावर घोडे घातले पहा, ती मुले ठेचून गेली पहा! त्या रक्ताच्या चिळकांड्या, ती मुंडकी, त्या किंकाळ्या, तो पळ, तो कण्ह! महाराज शाक्य राष्ट्र आपले मूल आहे. हा कसाई विद्युत्गर्भ आणि त्याचा दुष्ट सेनानी चंड सुरा घेऊन त्याचे पाठीवर येत आहे! ते रडत भ्यालेले लेकरू आपल्या कमरेला बिलगत आहे, आपण दया करा, वाचवा!

विक्रम : वाचवतो! ज्या शाक्य संन्याशाला राष्ट्राची इतकी दुर्दशा चालली असता सुखाने झोप लागते त्याला लागो! मला तरी ती लागते नाही, भगवन्, ऐकलंत ना सारे! मग उचलू ना हा खड्ग?

बुद्ध : संन्यासधर्माच्या,भिक्षुधर्माच्या हे सर्वस्वी विरुद्ध आहे! ह्याहून मी काहीच सांगू इच्छीत नाही.

विक्रम : तर मग तुम्ही न सांगता मी अशा त्या दुबळ्या जातिघातक, मनुष्यहितविरोधक संन्यसधर्माचाच हा संन्यास केला पहा! हे कर्तव्याचे कृपाण उचलले पहा! माझ्या शाक्य राष्ट्रा! हे संत्रस्त मनुष्यमात्रहो! राष्ट्रधर्मास्तव, मनुष्यधर्मास्तव, भूतदयेस्तव अपरिहार्य साधन म्हणून हा संन्यासी हे शस्त्र उचलीत आहे. पहा! हे शस्त्र मी अशा परिस्थितीत उचलीत आहे की, त्यायोगे विद्युत्गर्भाच्या क्रौर्यास पराजित नसले तरी पंगु करून टाकून सहस्त्रावधि जीवांस मी वाचवू शकणार आहे. गेल्या चाळीस वर्षातील शस्त्रसंन्यासाने मी जितक्या साधूंचे परित्राण आणि जिवांची दुःखापासून सुटका करू शकलो नाही तितके लोककल्याण ह्या शस्त्रधारणाने मी येत्या चाळीस दिवसांत करू शकेन! जातो मी. क्षणाक्षणाचा उशीर शाक्यांचा गळा मरणाच्या फासांत अधिकाधिक गुंतवीत आहे. तरीही हे चराचरहो, तुम्हीच साक्ष आहात की मी लोकहितास प्रसंगी प्रतिकूल जाणाऱ्या प्रतिज्ञांनी पंगु असलेल्या ह्या संन्यासाश्रमास सोडून जात आहे; ज्या आत्यंतिक अहिंसेमुळे दुष्टांचे परित्राण आणि साधूंचा विनाश होतो ती अहिंसा धर्म नसून प्रत्यक्ष अधर्मच असल्यामुळे मी तिला सोडून जात आहे; भगवान् बुद्धदेवास नव्हे! (जातो.)

अंक ३ रा

प्रवेश १ ला

(विद्युत गर्भ आणि कोसलचा सेनापति.)

कोसल सेनापति : कोसलेश्वर विद्युद्गर्भ महाराज, आपल्या शाक्यांवरील स्वारीच्या यशावर आज जवळ जवळ कळसच चढला! शाक्यांचा सेनापति वल्लभसिंह आज आपल्या हाती सापडला ह्याहून आपल्या कोसल राष्ट्राच्या पराक्रमास अधिक भूषणभूत ती कोणती गोष्ट असणार? तो वल्लभ लढवय्या मात्र खरा मोठा हटेल वीर! काल त्याने कोसलच्या सेनेस दे माय धरणी ठाय करण्याचा प्रसंग आणला होता. पण महाराज कोसलेश्वराचे दैव बलवत्तर

विद्युतद्गर्भ : आणि हे कोसल सेनापति, तुमचा पराक्रम बलवत्तर म्हणून हा वल्लभ आपले हाती सापडला. आता ह्या संधीचा उपयोगही तसाच कौशल्याने करून घ्यावयाचा! ही पहा, ही दोन पत्रे माझ्या हाती शत्रूंकडून आताच देण्यात आली. हे पहिले पत्र त्या गौतम बुद्धाचे आहे. हे अजाणांचे आचार्य जगातून नुसते छूमंतर म्हणताच युद्ध बंद करणार होते! सिंहाच्या दाढा म्हातारीच्या हिरड्यासारख्या मऊ आणि लवचिक करणार होते! हे मला आज्ञा सोडीत आहेत की 'वैर सोडा, शस्त्र खाली ठेवा.' दंडबलाहून क्षमा हिततर आहे. आमच्या वडिलांस ह्यांच्या ह्या भंगड छंदाचे वेड लागले, म्हणूनच कोसल राष्ट्राचे दंडबल इतके तुच्छ होत आले की शाक्यांसारख्या आमच्या सामंतांनी देखील आम्हांस धाब्यावर बसवू पहावे. बुद्धाची जाति शाक्य म्हणून बाबांनी शाक्यांच्या मुलीशी लग्न करणे मोठा सन्मान मानिला आणि मागणी घातली. पण त्यांनी एका दासीलाच शाक्य कन्या म्हणून बाबांना दिली. तिच्या पोटी मी आलो आणि ह्या शाक्यांच्या कपटाने जन्मभर माझ्या 'कपाळावर दासीपुत्र' म्हणून कलंक मारला गेला! ती आठवण झाली की अंगाची आग होते. ह्या शाक्यांस मी कोसलच्या घोड्यांच्या टापांखाली तुडविणार आणि मला बुद्ध म्हणतो वैराने वैर वाढत! शस्त्राने स्वतःचीच बोटे कापली जातात!

कोसल सेनापति : ज्याला स्वतःच शस्त्र पेलण्याची कुवत नसल्यामुळे त्याच्याच बोटांस ते लागते असा आमचा कोसलेश्वर कोणी नेभळट बुद्धधर्मीय शाक्य नाही! आपली नखे आपल्यालाच लागतील म्हणून किंवा उभ्या वनांतील पशूंचे वैर त्यायोगे वाढते म्हणून सिंह काही ती कापून टाकीत नाही. महाराज, तुमच्या वडिलांप्रमाणे ह्या बुद्धवेडास तुम्ही बळी पडला नाही आणि कोसलचे सैन्यबळ आणि शस्त्रबळ सुसज्ज ठेवलेत म्हणून आज कोसल राष्ट्र, राष्ट्र आहे. नाहीतर आज जी शाक्यांची स्थिति आम्ही करीत आहो तीच कोसलची स्थिति सीमाप्रांतावरील बर्बर राष्ट्रे करती! बुद्धाचा उपदेश ऐकून जर वनचा सिंह आपली नखाग्रे आणि दाढा कापील तर उद्या त्याच्या पाठीवर चढून माकडे देखील मिरवू लागतील! मृगच त्याची मृगया करतील! आम्ही दिग्विजय करीत कोसलचे साम्राज्य स्थापणार!

विद्युद्गर्भ : ह्यास्तवच ह्या आगंतुक उपदेशपत्राला उत्तर म्हणजे त्यास असे फाडून तुडविणे! आता दुसरे पत्र; पण पहिल्याच्या अगदी उलट. कारण हे एक्या शब्दनिष्ठ संन्याशाचे नसून

शस्त्रनिष्ठ संन्याशाचे आहे. हे त्या सेनापति विक्रमसिंहाचे आहे. हा भिक्षु झाला होता म्हणूनच शाक्य आपल्या हातात गवसण्याइतके दुबळे झाले. हा आता पुन्हा शस्त्र धरून त्यांचा सेनापति होऊन समरात उतरला आणि तत्क्षणी शाक्यांत अपूर्व चेतना पेटून तो ह्या पत्राने आम्हांस देश सोडून जाण्यास आज्ञापीत आहे! त्यास थोडे चुचकारूनच घेणे बरे.
कोसल सेनापति : त्यापेक्षा संन्याशाची आत्यंतिक शस्त्र-धारणाची शपथ त्याने मोडली म्हणून खूप निंदा करून तिचाच गवगवा करावा म्हणजे शाक्यांत तो पुष्कळ अपूज्य आणि अप्रिय होईल!
विद्युद्गर्भ : अगदी ठीक. त्याचबरोबर बुद्ध जेणेकरून शाक्यांत अत्यंत पूज्य आणि प्रिय होईल असे करण्याचे आपले धोरणही चालविले पाहिजे. कारण संन्यासप्रवण बुद्धतत्वांस अधिकाधिक आचरून शाक्य राष्ट्राचा कृषिक्षय, प्रजाक्षय आणि शक्तिक्षय जसा होत आला तसाच होत राहून ते अधिकाधिक दुबळे होईल म्हणून मी शाक्यांस उद्देशून खालील अर्थाची घोषणा ह्या प्रश्नाचे अप्रत्यक्ष उत्तर म्हणून करणार आहे की, कोसलेश्वरास श्रीगौतम बुद्धांविषयी फार आदर वाटत आहे. संसारांतील कोणताही मोह त्यांस संन्यासधर्मापासून चळवू शकला नाही. शस्त्रसंन्यासाची, अहिंसेची, दयाममतेची त्यांची, प्रतिज्ञा त्यांनी अशा कठीण प्रसंगीही अभंग ठेवली. खरा निरिच्छ, मुक्त तो असा असतो. शाक्यांच्या शत्रूंना देखील त्यांचा फार आदर वाटतो. पण म्हणूनच ज्या शाक्यांनी, तशा थोर विभूतीला जन्म दिला त्यांनी, त्यांचे अनुयायित्व पत्करणे सोडून बुद्ध भगवानांची ज्याने आज्ञा मोडली, त्यांचा उपमर्द केला, संन्यासाच्या पवित्र प्रतिज्ञा मोडून जो पतित झाला, स्वजातीच्या नांवाला ज्याने कलंक लाविला, त्या पापी, पतित विक्रमसिंहाच्या मागे शाक्यांनी लागावे ह्याचा आम्हांस अत्यंत खेद होत आहे. म्हणूनच भगवान् बुद्धांचा उपमर्द ज्याने केला त्या विक्रमास हुसकून देऊन, त्यास पतित म्हणून जातिबहिष्कृत करून शाक्य आपली राजधानी आठ दिवसांच्या आत आमच्या हाती सोपवून देतील तर आम्ही त्यांची शाका करणार नाही. याउपर एकही रक्तबिंदु गाळणार नाही. नाही तर विक्रमास दंड देण्यासाठी त्याचा पुत्र सेनापति वल्लभसिंह जो आमच्या विजयी सैन्याच्या हाती पडला आहे त्याचा तत्काळ वध केला जाईल. उलट पावली ह्याचे उत्तर हवे!
कोसल सेनापति : वा! अगदी योग्य. हे घोषणापत्र इकडे प्रसिद्ध करावे नि विक्रमसिंहाने अडवून धरलेले आपले हे एक सैन्य तसेच उभे ठेवावे पण इकडून गुप्त छापा घालण्यासाठी आडमार्गे त्यांच्या राजधानीवर, कपिलवस्तूवर, चढाईन दुसरे सैन्य धाडून द्यावे. शाक्य शरण आले तर सहजच त्यांची शाका करून त्यांस नामशेष करून टाकता येईल.
विद्यद्गर्भ : ह्या शरणागतीच्या सापळ्यात शाक्य सापडले तर माझा डाव सहजासहजीच साधणार. ते लढले तरीही साधणारच. काही झाले तरी आता शाक्यांच्या आजवरच्या छळाने माझी तृप्त न झालेली संतापतृष्णा मी शाक्यांच्या राजधानीच्या नरडीचा घोट घेऊन तृप्त करणारच करणार!

प्रवेश २ रा

(नलिनी आणि सुलोचना)

सुलोचना : सखे, मी हे काय ऐकिले? शेवटी शाक्यांचा सेनापति, माझा प्राणपति, माझा वल्लभ शत्रूंच्या हाती सापडला ना! नलिनी, त्या वीर केसरीने कोणच्याही वीराने गाजविला नसेल असा पराक्रम गाजविला! शाक्याचे उधळून गेलेले सैन्य एकत्र करून विजेसारख्या अकस्मात् कडकडत येणाऱ्या कोसलांच्या सैन्यास कोलमडून मागे हटविणारा पहिला आघात केला आणि शेवटी शत्रूच्या दुसऱ्या सैन्याने एकाएकी दुसरीकडे येऊन घेरले तरी एखाद्या हटेल हत्तीसारखा झुंजत राहिला. आणि शेवटी शत्रूंच्या हाती तो सांपडला तो केवळ त्याचे राष्ट्र निर्बल होते म्हणून, त्याचा पराक्रम कमी पडला म्हणून नव्हे.

(चाल: रे कहां जा निसार)

गे नसे जित पहा । सेनानी । अबल तो । म्हणुनी हा ।। ध्रु. ।।

अबल परी तद्राष्ट्रचि म्हणुनि अपजयी हा ।। १ ।।

नलिनी, माझ्या वल्लभाच्या ह्या वीरतेच्या अभिमानाने डोलू लागू की माझा वल्लभ मला आता नित्याचा अंतरला म्हणून भरून येणाऱ्या ह्या माझ्या हृदयाशी सांत्वनाचे चार शब्द बोलू लागू, का ज्या विद्युद्गर्भाने माझ्या वल्लभाला रणबंदी केले त्याचा शिरच्छेद करण्यासाठी क्रोधाने अंध झालेल्या वाघिणीसारखी पिसाळून कोठे तरी झेपा घेत चालू लागू! नलिनी, माझ्या वल्लभाचे तो मेला कोसलचा राक्षस कोण हालहाल करील, नाही ग! ते मेले त्या माझ्या सेनापतीस टाकून बोलतील, छळतील! आणि अशा वेळी तेथे समाधानाचा एक शब्द देखील बोलण्यास कोणी ममतेच नसेल. हे बघ नलिनी, डोके जरी नुसत कलकलले तरी लगेच माझ्याकडे यायचे बरे का ग. आताशी सेनापतिपद स्वीकारल्यापासून दगदग भारी पडे. त्यात जेव्हा एखादा रिकामा क्षण सापडेना, तेव्हा चटकन असे माझ्या छातीशी मस्तक ठेवायचे. माझे हात असे डोक्यास लावायचे नि म्हणायचे, 'बघ ह्या तुझ्या वक्षाच्या मऊमऊ गालुशांत मस्तक टेकताच त्यांनी सगळा शीण कसा शोषून घेतला बघ! आता मनाला किती तजेला आला म्हणून सांगू?' अस्सा गोडबोल्या स्वभाग ग त्यांचा! पण आता त्या क्रूरांच्या छळांनी संतप्त झालेल्या त्या मस्तकास कोणाचे ममतेचे अश्रु शीतलवितील? कोणाचे बोलणे त्यांचा शीण हरण करील?

नलिनी : खुळे, वीर पुरुषांचे ते केवळ चोचले असतात उणिवा नसतात. रणदुंदुभीच्या धिंगाण्याच्या तालावर मरण मारणाऱ्या भयंकर किंकाळ्यांचा जो रणकल्लोळ माजतो तोच वीरांचे शीण घालविणारे मधुर संगीत असते, तुम्हा आम्हा ललनांच्या लवचीक अंगाया नव्हेत! मोहक महिलांच्या मांसल वक्षाच्या मऊमऊ गालुशावर मस्तक टेकणे ही त्यांची एक लहर असते, आवश्यकता नसते. सखे, एक वेळ मस्त हत्तीचा पाय फुलमाळांनी बांधता येईल; पण हुतात्म्यांच्या पायास लंपट लोभाने आम्हा ललनांस संसाराच्या दाराशी बांधून ठेवता येणार नाही.

संसाराच्या सगळ्या भोगांचा रंग त्यात प्रतिबिंबित झाला असताही अशा वीरात्म्यांचा आत्मा स्थितप्रज्ञांच्या आत्म्यासारखा स्फटिकवृत् निर्लेप, निःस्पृह आणि निस्संग असतो! वीर वल्लभच पहा! रागावू नकोस. तुझ्यावाचून इथे असता क्षणभर करमत नसे ना त्याला? पण परवा कर्तव्याचे रणशृंग फुंकले जाताच तुझ्यासारख्या लावण्यलतिकेस अंकावरून तत्काळ दूर सारून परत तुला निरोप कळविण्यालाही घरी क्षणभर न परतता स्वदेशार्थ, लोकहितार्थ शिर हातावर घेऊन रणाच्या आणि मरणाच्या जबड्यात नीट चालून घेता झाला. त्या वीर वल्लभाहून कोणचा संन्यासी अधिक मनोजयी किंवा संन्यस्तेंद्रिय असू शकणार आहे?

(चाल - सुमरण तोरा-)

संन्यासी कोण । त्या हुतात्म्याहून । निःसंग जितकाम ।। ध्रु.।।

रणशृंग होताच । आलिंगनातूनि रतिच्या उडी घे ।

रणि देवकार्यी सहसा उफाळोन ।। १ ।।

सुलोचना : म्हणूनच सखे, ते तसे क्षणात आपणांला सोडून गेले ह्याचा राग न येता उलट अशा निःस्पृह कर्तव्यवीरांचा लोभ तसा क्षणभर तरी आपणांवर बसतो, हाच आपल्या अंगनांचा परम विजय होय अशी कृतज्ञ धन्यता आपणांस वाटावयास हवी. लंपट प्रेमापेक्षा असे त्यागी प्रेमच आम्हा कामिनींना खरोखरच लंपट करते. म्हणूनच अशा वीरवराच्या ह्या त्यागी प्रेमास शोभेन अशी ही त्यांची अर्धांगीही ह्या संकटात वागणार. नलिनीर मी सेनापति वल्लभाची पत्नी; सेनापति राष्ट्रपितामह विक्रमांची स्नुषा, मी कोलियन क्षत्रिय कुलाची कन्या- नलिनी, मी त्या दुष्ट विद्युद्गर्भाच्या सैन्यास आणि शक्य तर त्यास नागिणीसारखी डसणार. मी सैनिक वेष घेऊन शाक्यांच्या सैन्यांत शिरणार. वीर वल्लभ कर्तव्याचे रणशृंग वाजतांच जसे मजकडे वळून पहाण्यासाठी देखील थांबले नाहीत तशी मी पण आता ह्या माझ्या मांडल्या संसाराकडे निरोप घेण्यापुरती देखील वळून पाहणार नाही. हा बघ, सोंगट्यांचा पट तसाच मांडलेला; ही बघ ती माळ! सखे, पुरे आठ दिवस झाले असतील नसतील आमच्या प्रीतिसंगमाच्या पहिल्या वाढदिवशी भगवान कामदेवाची पूजा करण्यासाठी मी ही माळ ओवीत होते, मी येथेच वल्लभांना गळ घालीत होते, त्या वेळी त्यांच्याशी खेळण्यासाठी हा सोंगट्यांचा पट मांडला. हाय हाय! मी त्यांस प्रेमाची गळ घालीत होते. त्याच क्षणी मला काय माहीत की काळाचा प्राणघातक गळही माझ्या प्रियकराच्या मानेवर फेकला जात होता! नाही तर मी शेवटच्या भेटीचा तो क्षण पोरसवदा अबोल्यात आणि रुसण्यात घालवला नसता. हा संसाराच्या पटावरील सुखाचा शेवटचा डाव खेळून घेतला असता. चालले मी हा संसाराच्या सोंगट्यांचा पट असा उधळून .

(चाल - आखोंने तेरे गममें)

शत जन्म शोधिताना । शत आर्ति व्यर्थ झाल्या ।

शत सूर्य मालिकांच्या । दीपावली विझाल्या ।। ध्रु. ।।

तेव्हां पडे प्रियासी । क्षण एक आज गांठी ।

सुख साधना युगांची । सिद्धीस अंति गाठी ।। १ ।।
हा हाय जो न जाई । मिठि घालु मी उठोनी ।
क्षण तो क्षणांत गेला । सखि हातचा सुटोनी ।। २ ।।

नलिनी : हां हां! सखे, अगदीच वैतागू नकोच! अजूनही दान आपणांस अनुकूल पडणारच नाही म्हणून कशावरून? कोणी सांगावे, आपले शाक्य पितामह विक्रम आता रणांगणात उतरल्याने शत्रूंवर शाक्य अजूनही विजय मिळविणार नाहीत म्हणून! वल्लभांची सुटका होणार नाही म्हणून - पुन्हा तुझ्या प्रियकराशी प्रीतिरतीचा अपुरा राहिलेला हा डाव तुला वियोगानंतरच्या अधिकच मनोहारी झालेल्या एखाद्या नवसंगमात पुन्हा खेळता येणार नाही म्हणून! ह्याहूनही आश्चर्यकारक अशा सुखान्त घटना ह्या जगात घडल्या आहेत!

सुलोचना : आणि घडल्या नाहीतही. विधि हा काही इष्टलोलुप अल्लड प्रेक्षकांच्या पैशाने ओशाळलेला कोणी नाटककार आहे की काय! की त्यांनी त्याची सगळीं नाटके अनैसर्गिक विपर्यास करून सुखान्तच रचली पाहिजेत.

नलिनी : ते खरे ग. पण मन काय म्हणते तेही ऐकले पाहिजे. त्याला अशा आशेने धीर..

सुलोचना : छट्! कसले मन? हे बघ, मनासारखी गोष्ट घडेतो ह्या माझ्या मनाच्या मुखावर मी विवेकाची मुद्रा ठोकून दिली. मरणापूर्वी माझा वल्लभ जेव्हा आणि जर कधी भेटेल तर आणि तेव्हाच त्याचा हात काय तो ही मुद्रा उघडील. सध्या तू मला मन काय म्हणते ते सांगू नकोस, कर्तव्य काय म्हणते तेवढेच सांग.

नलिनी : वीरांगने, ऐक तर! कर्तव्य हेच म्हणते की, वल्लभ शत्रूंच्या हाती सांपडले असता, ही आपली शाक्य जाति त्या छळकाचे, विद्युद्गर्भाचे तरवारीने भोसकली जात असता आम्ही क्षत्रिय कन्यांनी अंतःपुरात असे मुळमुळु रडत न बसता तू म्हणतेस तसे सैनिक वेष घेऊन, शत्रूंचा शक्य तो सूड उगवीत, खड्गार खड्गातून उठलेल्या ज्वालावर चढून प्रिय स्मृतीसह सती जावे! कारण

(चाल - मज द्याहो जगी आसरा)
मृतकाष्ठ तृणाग्नीत ना । सती जातात वीरांगना ।। ध्रु.।।
शस्त्रसंघर्षि घे चेतना । तया रणाग्नीत दारुणा ।
सूऽडाऽच्या । जातात वीरांगना ।। १ ।।

सुलोचना : तर मग झाला ना तुझाही तोच निश्चय? हे बघ जनहिताला हानिकारक अशा संन्यासाचाच संन्यास करून माझे श्वशुर विक्रमसिंह राजधानीपासून सुदूर जिकडे शाक्यांची सेना लढवीत आहेत. तिकडेच आपण दोघी पुरुषी वेषाने जाऊ म्हणजे तिकडे आपणांस सहसा कोणी ओळखणार नाहीत. मामंजीनी तर मला कधी पाहिलीही नाही. चल, उधळला, बघ हा मांडलेला संसाराच्या डावाचा पट आणि झटपट उचलली बघ ती असिलता. सध्या माझ्या सवंगड्यांने रणांगणाचा डाव मांडला आहे तोच खेळू मी जाणार! सखे, माझ्या रतिरंगाच्या आचार्यानेच मला रणरंगाची विद्या शिकविली आहे. पहिलीने मी रतिपति भगवान् कामदेवाला जसे प्रसन्न केले

तसेच आज दुसरीने रणपति भगवान् कार्तिकेयालाही प्रसन्न करणार. माझ्या आचार्यांची मी द्विवेदी पट्टशिष्या ह्या दोन्ही वेदांत उत्तीर्ण होणार आणि त्यांचा असा दुहेरी लौकिक जगत्तलावर गाजवणार!

(चाल: नन्नु ब्रूवनी)

रति अंगणी । कामदेव जसा। अश्रुसिंचनी अभिषेकिला ।। ध्रु. ।।

रणरंगणी रक्त-वर्षे अजी । अर्चीन देवा कार्तिकेया तसा ।। १ ।।

प्रवेश ३ रा

(भिक्षु शाकंभट आणि एक भिक्षुणी)

शाकंभट : तुला खरेच सांगतो की बुद्ध भगवान् जे म्हणतात की त्या संसारासारखे दुःख नाही आणि ह्या संन्यासासारखे सुख नाही ते अक्षरशः सत्य आहे. निदान ह्या बुद्ध संघासारख्या एखाद्या श्रीमंत संघातील संन्यास हा तरी त्या माझ्या दरिद्री संसाराहून शतपट अधिक सुखकर आहे, ह्यांत दुमत होणेच शक्य नाही. तरी अजून मी साधारण भिक्षु म्हणून अशा दुय्यम विहारांतील- मठातील- दुय्यम टोळीतूनच ठेवलेला आहे! अग ह्या संन्यासात त्या संसारातील जीवाचे सर्व सुख मिळून, त्यावाचून त्या संसारातील जे परम दुःख की त्या जिवाच्या सुखासाठी जिवापाड मेहनत करावी लागणे, ते देखील ह्या संन्यासात नाही. अग, शेती न करता धान्य, चूल न पेटवता अन्न, झाडे न लावता फळे, ती चावून गिळण्याची काय मेहनत पडेल तेवढी लोककल्याणार्थ आम्हा भिक्षूंना घ्यावी लागणार! फार काय, पण जपजापाच्या ढालेखाली लपता आले तर संन्यासश्रमात पाय ठेवताच आयदीपणा देखील पुण्य होतो हा माझा तरी अनुभव आहे खरा!

भिक्षुणी : इश्शऽऽग बाई! तुमचा अनुभव तसा असेल पण शाकंभिक्षु, माझा मात्र उलट अनुभव आहे हो. मी काही खायला घरी नव्हते म्हणून भिक्षुणी झाले नाही. पण मला पोटदुखी भयंकर छळी आणि माझ्या घराशेजारच्या एका ओंगळ म्हातारीची भयाण दुर्दशा पाहून आपण म्हातारे होतो की काय ह्याची भीति वाटे. इतक्यात हे तुमच्यासारखेच चार लफंगे भिक्षु गावात येऊन सांगू लागले की, बुद्ध भगवानांच्या धर्मात शिरताच मनुष्य सर्व दुःखांपासून मुक्त होतो! न म्हातारपण, न रोग, न मरण! तेव्हा हुरळले मी. मला वाटले आता जन्मभर अशी कंबर ताठ, डोळे मारू, चाल ठुमकती, तारुण्याची मूर्तीची मूर्ति राहणार मी! पण भिक्षुणी होऊन पहाते तो सारेच ऑफस्? संगती सोबतीला तरी कुणी चांगला भिक्षु हवासा म्हणावा तर ही तुमची जोडी! अडला नारायण-! ह्या धक्क्याने माझी पोटदुखी मात्र दुप्पट झाली!

शाकंभट : अग, दुप्पट पोटदुखीविषयी विचारशील तर अशा दुहेरी संगतीसोबतीचा तो अवश्यंभावी परिणाम असणारच. तो दोष असलाच तर निसर्गधर्माचा होय. बुद्धधर्माचा नव्हे! आणि म्हातारपण टाळण्यासही एक उत्तम उपाय होताच.

भिक्षुणी : सांगा, सांगा, शाकंभिक्षु अजून तरी सांगा. ह्या जन्मात कधीही म्हातारे न होण्याचा तो उत्तम उपाय कोणचा?

शाकंभट : तरुणपणीच जीव देणे! ह्या सुईने हा म्हातारे होण्याचा पायात रुतलेला काटा काढण्याचे सोडून तू बुद्ध धर्माची कुऱ्हाड घेऊन त्यावर धावलीस हा तुझा मूर्खपणा! भिक्षु काय करतील त्याला? तीच गोष्ट तुझ्या ह्या धर्माविषयीच्या इतर आशांची! तुला एवढे कळेना की जगांतील प्रत्येक धर्म लोकाचे सर्व दुःख दूर करण्याच्या, जन्म, जरा, व्याधि आणि मरणापासून त्यांची सुटका करण्याच्या ज्या आशा दाखवितो, ज्या वचनचिठ्ठ्या लिहून देतो त्या सर्व पारलौकिक

परिभाषेत असतात, ह्या लोकाच्या भाषेत नव्हे. ज्या जन्मास हे धर्म टाळणार तो हा जन्म असू तरी कसा शकेल? कारण हा जन्म तर येऊन गेला देखील! अर्थात ह्या सगळ्या पुढच्या जन्माच्या आशा. सगळ्या धर्मांच्या ह्या असल्या आशांच्या हुंड्या नेहमी परलोकाच्या पेढीवर पटविण्यासाठी लिहिलेल्या असतात. आणि त्यावरील दिव्य पत्ता उघड्या डोळ्यांनी वाचू लागताच ते दिपून जात असल्यामुळे मरणाने डोळे मिटल्यानंतरच तो क्वचित् वाचता आला तर येणार! ह्या सगळ्या धर्मांच्या कामधेनु यमराजाच्या गोठ्यात बांधलेल्या, ह्यांच्या कल्पवृक्षांच्या आंबराया स्मशानाच्या पड्यालच्या उद्यानात लावलेल्या, आणि अग ह्या सर्वांचे स्वर्ग मेल्यानंतर दिसणारे! उद्या जर अगदी ह्या जन्मी, ह्या जगी आणि अक्षरशः सर्व दुःखांच निवारण करणारा धर्म खरोखरीच निघाला ना, की ज्याचा अनुयायी होताच कुपथ्य केले तरी रोग होते ना, म्हातारे झाले तरी जरा येती ना आणि हाक मारली तरी मरण ओ देते ना, तर वेडे पोरी अशा धर्माच्या प्रचारासाठी हजारो भिक्षु प्रचारक अगदी तुझ्या घरापर्यंत धाडण्याची आवश्यकता तरी पडती का? अशा धर्मात येण्यासाठी ह्या लोकीचे तर काय पण चंद्रलोकीचे लोक त्या धर्ममंदिराकडे पायी चालत येते आणि भयंकर दाटी झाल्यामुळे त्या मंदिराची दार तुम्ही उलट बंद करू लागतेत ना तरीही 'असा हा धर्म आमचा जन्मसिद्ध हक्क आहे' असे गर्जत लोक बंड करून उठते बंड! पण ह्या सर्व धर्मांच्या वचनचिठ्ठ्यांची रक्कम ह्या जन्माच्या चलनी नाण्यात रोखठोक मोजून देणारा सावकार ह्यांच्यांत कोणी नाही. ज्या उदाहरणाच्या उत्तराचा पडताळा पहाताच येत नाही अशा उत्तराप्रमाणे हे सारे धर्म सारखेच खरे किंवा खोटे असणार!

भिक्षुणी : इश्शऽऽग बाई. शाकंभिक्षू, पण जर का तुम्ही असा धर्माविरूद्ध उपदेश भिक्षुणींना देता आणि त्यांच्याशी असा लगटीचा संबंध ठेवता हे मी बुद्धदेवाच्या कानावर घालून गवगवा केला तर?

शाकंभट : तर काय! अग स्त्रिया किती उलट्या काळजाच्या असतात हे बुद्धदेव चांगले जाणून आहेत. त्या चिचाबयाने नाही का प्रत्यक्ष बुद्धदेव तिच्याशी असा लगटीचा संबंध ठेवतात म्हणून एक मोठे प्रकरण माजविले? जो जगाचा गवगवा त्या निलज्र्ज आरोपासही ऐकण्यास कचरला नाही तो ऐकण्यास मीही कचरणार नाही! आणि धर्माविरुद्ध मी जे बोलतो की जन्म-व्याधि-जरा-मृत्यु ह्यांपासून अक्षरशः आणि इहजन्मी मनुष्यास मुक्त करण्याची कोणत्याही धर्माची प्रतिज्ञा ही केवळ एक थाप आहे, ते मी प्रत्यक्ष बुद्धांच्याच उदाहरणावरून सिद्ध करून देऊ शकतो. प्रथम जन्म तो बुद्धांना येऊन गेलाच. व्याधींचे तर बोलणंच नको. प्रथमतः ते स्मशानांतील विकीर्ण प्रेतवस्त्रंच वापरीत. पण भयंकर रोग त्यापासून उत्पन्न होऊ लागले तेव्हा नवीन वस्त्रे वापरण्याची भिक्षूंस आज्ञा देऊन स्वतः तर राजप्रदत्त बहुमोल झगा वापरू लागले. पहिल्याने औषधे घेणे पाप समजले; पण पुढे राजवैद्यसुद्धा येऊ जाऊ लागले. आणि स्वतःचा एक देह वाचविण्यासाठी शस्त्रवैद्याकरवी लाखो रोगाणूंची हत्या करण्यासही अहिंसेचे भोक्ते मागेपुढे पाहीनासे झाले. कसला राजबिडा पुरुष दिसे तो तारुण्यात! जर तेव्हाच अवतार समाप्त होता तर निदान जरेच्या हाती

तरी ते नाहीच सापडले असे भोळसट लोक म्हणते. पण जणू काय तेवढीही फुशारकी मारावयास मिळू नये म्हणून नियतीने त्यांस उदंड आयुष्य देऊन आता जरेच्याही हाती सोपवून दिले. कोणच्याही इतर म्हाताऱ्याप्रमाणे दांत गळू लागले, अंगप्रत्यंगाचे पोक निघाले. जरेचा उभ्या जगातून नायनाट करू निघण्याच्या प्रौढीचा जरेन त्यास स्वतःच जर्जर करून असा सूड उगविला! आणि मरणाविषयी तर आता स्वतः बुद्ध भगवानच येता जाता आपला मृत्यू जवळ आल्याचे भिक्षुवर्गास सांगून संघाची मरणोत्तर व्यवस्था लावू लागले आहेत! पण स्वतः निर्वाणपद पोचलेल्या भगवानांची इतकी दुर्दशा होत असताही ज्या स्वर्गात बुद्ध भगवान् वारंवार सदेह जातात येतात म्हणून भोळे लोक म्हणतात त्या स्वर्गातील एक तरी अप्सरा त्यांच्या शुश्रूषेस कधी आलेली पाहिलीस का तू? अग म्हणूनच अप्सरांच्या वरातीची वाट न पाहता तुझ्यासारखी जी टाकाऊ भिक्षुणी मिळेल तीच अशी बगलेत मारून ह्या जन्माची आपली वरात साजरी करणे हेच मी शहाणपण समजतो.

भिक्षुणी : इश्श ग बाई. मला काय म्हंटलेस? टाकाऊ? भटुरड्या!

शाकंभट : अग, टाकाऊ म्हणजे दुसऱ्या सगळ्यांनी टाकून दिलेली; मला टाकाविशी वाटते ती नव्हे. सगळ्यांना हव्याशा वाटतात त्यांना आमचा हात पोचतो कशाला! म्हणूनच सगळ्यांनी टाकलेल्या नरोटीला देखील भिक्षु सत्पात्रच समजतात! (घंटा होते.)

भिक्षुणी : इश्शऽऽग बाई! ही झाडलोट, आवराआवर इत्यादि कामाची घंटा झाली.

शाकंभट : म्हणजेच माझ्या ध्यानाची वेळ झाली. जा तू आत.

भिक्षुणी : हा लागलाच आता माझ्या नावे शंख व्हायला! इश्शऽऽ ग बाई. जाते हो- येतेच मी परत! इश्शऽऽ ग बाई! (जाते.)

शाकंभट : आता मला देखील चटकन् ध्यान लावलेच पाहिजे. नाहीतर ह्या विहाराचा तो मुख्य मठाधीश स्थविरडा म्हणजेच थेरडा आता येईल मला पण झाडलोट करण्यासाठी वेठीस धरायला. त्यातल्या त्यात हा महास्थविर आपला महानंदीच आहे इतके बरे. कोणी नुसता डोळे मिटून जरी बसला तरी तो भिक्षु ध्यान करीत आहे असे समजून त्याला हा कामास धरून नेत नाही. त्यामुळे मठाच्या कामाची वेळ हीच साहजिंकपणेच माझ्या ध्यानाची वेळ होते. हो, भिक्षूचे मुख्य ध्येय सर्व कामांचा संन्यास. नुसती झाडलोट का होईना, पण हेही कामच म्हणून त्याची देखील टाळाटाळ करून मी पूर्ण निष्काम बनण्याचा यथाशक्ति प्रयत्न जो करतो तो भिक्षुधर्मास अनुसरून आहे. हा आलाच कोणी तरी बोलावू! आता डोळे मिटून चटकन् ध्यानाची धारणा केली नाही तर डोळे चोळीत खराट्याची धारणा करावी लागेल! पण गंमत ही की डोळे मिटून मठाचे सगळे काम संपेतो बसण्याची सवय करता करता मला ध्यान-समाधीची नसली तरी निद्रा-समाधीची सिद्धि मात्र साधली खरी. हो, बसून गाढ झोप घेण्याची कला हीही एक सिद्धिच नव्हे का! बापरे, आलाच हा. (डोळे मिटतो तोच एक भिक्षु प्रवेशतो. तो जसजसा पुढे जातो तसतसा

डोळे मिचकावीत आणि तो संशयाने परत बघताच डोळे मिटीत तो गेल्यावर) गेली ही ब्याद! पण ह्याला आज शंका आलीशी दिसते. आज आता ह्या नुसत्या डोळे मिचकावून ध्यानाने भागणार नाही. ध्यानाची पहिली बाह्य परीक्षा म्हणजे डोळे मिटलेले असणे. पण शेवटची परीक्षा म्हणजे कोण्या हलकट भिक्षुणीने गुदगुल्या केल्या तरी शुद्धीवर न येणे. ती परीक्षादेखील उतरेल असे ध्यान आज लावले पाहिजे! त्याची ही प्रत्यक्ष गुरुकिल्ली (भांगेची गोळी काढून) ही माझी पूर्वपरिचिता, गुरुबाजीसारखी थापेबाजी न करता जी अगदी ह्या देही, ह्या क्षणी, सकल दुःखांचा भंग करते आणि म्हणूनच जी पुढे पुढे प्राकृतात भांग ह्या नांवाने गाजण्यास गांजापेक्षाही योग्य ठरणारी आहे ती ही गुटिका! -चल भगवती भांगे, विहिरीत गळ पडावा तशी तू माझ्या गळ्यात अशी धाडकन पड! (गोळी गिळून) ओम्! ओम्! वा, मनाचे बाहेरचे डोळे कसे मिटत चालले आणि मनाचे आतील डोळे उघडत चालले. कोण चित्रविचित्र तरंग! कसा तरंगत चाललो आहे मी. अलौकिक दर्शने दाखविणारी सविकल्प समाधि ती हीच तर नसेल ना? उपाय भिन्न, पण वृत्ति एकच. योगशास्त्रात माझी खरोखरीच प्रगति होते आहे की काय? आणि अरे मी हरवत चाललो! अहो धरार धरा! निर्विकल्प समाधीच्या उतरत्या निसरड्यावरून घसरलो मी. (जमिनीवर पसरतो) झोपे, मठातील कामकाज आटोपल्यावर तरी मला जागे होऊ देशील ना? कोण म्हणतो शास्त्रवचने खोटी म्हणून! हा पहा तंतोतंत अनुभव! सगळीं कामं टळली नैष्कर्म्यसिद्धि परमां अचिरेणाधिगच्छति । (सपशेल पसरतो.)

भिक्षुणी : (अकस्मात् प्रवेशून) इश्शऽऽग बाई! ध्यानाच ढोंग करता करता स्वारी निजली वाटते. गुदगुल्यांच अंजन देते नि सगळे ढोंग उघडकीस आणते थांब. (गुदगुल्या करून) अग बाई खरेच ध्यान! गुदगुल्यांनी देखील भंगत नाही! अभंग समाधि तर नाहीना तर मग स्थविरांना हे कळविलेच पाहिजे. अभंग समाधि लागलेल्यापाशी ते स्वतः पहारा देऊन त्यांच्या देहाचे रक्षण करतात. अहो स्थविर महाशय! याहो या! शाकंभिक्षूंना अभंग समाधि लागली! अभंग समाधि!

शाकंभट : (ताडकन् उठून) कोण म्हणतो ही अभंग समाधि म्हणून? ही अभंग समाधि नाही. ही सभंग समाधि आहे. भगवती भांगेच्या प्रसादाने ती लागली असता तिला सभंग समाधि म्हणण्याचे सोडून अभंग समाधि म्हणून मी भांगेशी कृतघ्न होणार नाही; सभंग समाधि म्हण! सभांग समाधि! सभांग म्हण!

भिक्षुणी : (आपले आणि त्याचे तोंड दाबीत) चूप! चूप! हळू! शाकंभिक्षु स्थविरान ऐकल तर! शुद्धीवर या! शुद्धीवर या!!

तारकसिंह : (प्रवेशून) थांबा, त्या चोराला मी शुद्धीवर आणण्यासाठीच आलो आहे. नीचा भटुरड्या, बोल. ह्या खडावा कोणाच्या? चोरा, माझ्या खडावा चोरल्यास! मागे माझी झोळी चोरलीस ती पचली. पण आता जीव घेतो तुझा. आण त्या खडावा!

शाकंभट : (लगदालगदी करीत) त्या माझ्या खडावा! नि तुझ्या असल्या म्हणून काय झाले? भिक्षु झालास तरी खडावासाठी प्राण टाकतोस?

ताकंसिंह : टाकणार! माझ्या पायातील खडावापायी माझा प्राण गेला तरी बेहत्तर! (एकेक खडावा घेऊन तडातड मारीत राहतात.)
भिक्षुणी : इश्श ऽऽ ग बाई! पूर्वी सुंदोपसुंद त्या मोहिनीपायी झुंजले तसे ह्या खडावापायी झुंजून हे दोघेही प्राणास मुकणार खचित! अहो शाकंभिक्षु (तो झिडकारताच) इश्शऽऽग बाई!! अहो ताकंभिक्षु (तोही झिडकारताच) इश्शऽऽग बाई!!
मुलगी : (पडद्यातून) वांचवा, मला वांचवा. (प्रवेशून) भिक्षूंनो, वांचवा मला. मी शाक्यांच्या राजघराण्यातील एक कन्या आहे. कोसलांच्या सैन्यातील दैत्य, एक तर मला सेनापति चंडाची दासी करण्यासाठी नाहीतर मला ठार मारण्यासाठी धावत येत आहेत. बुद्धविहारात मला अभय मिळलेच पाहिजे!
शाकंभट : भिऊ नकोस मुली! (खडावा पराजीत) ह्या विहारात कोणी सैनिक शिरले तर मी असे छाटून टाकीने त्यांना! फडशा पाडीन त्यांचा!
सैनिक : (प्रवेशून) काय म्हणतोस भिकारड्या?
शाकंभट : (थरकापत) काही नाही! बुद्धविहाराचे नियमांप्रमाणे सशस्त्र सैनिक आत शिरतच नसतात. ही निराश्रित वाटल्यामुळे मी म्हंटले ते शिरले तर मी फडशा पाडीन त्यांचा. आपण आत शिरणार असे माहीत असते तर मी तसे मुळीच बोललो नसतो!
सैनिक : थापा ठोकतोस! ए भागूबाई! ए भागूबाई!
शाकंभट : (भिक्षुणीस) ए बाई! ओ दे, तुला हाका मारताहेत!
भिक्षुणी : इश्शऽऽग बाई! मी नाही हो यांच्यात.
सैनिक : भित्र्या, तिला नाही तुला- थापा ठोकतोस.
शाकंभट : शिव शिव! आम्ही भिक्षु, अहिंसा हेच आमच मुख्य व्रत. ठोकणे, मारणे, पिटणे असले हिंसात्मक शब्द उच्चारणे हे देखील आम्ही पाप समजतो. तेव्हा वीरवरांनो, आम्ही थापा ठोकू कसे? नाही महाराज, आम्ही अहिंसाव्रत इतके कडकपणे पाळतो की, आम्ही थापास देखील ठोकीत नाही, चकाट्यांनादेखील पिटीत नाही, गप्पास देखील झोडीत नाही, हाकेलादेखील मारीत नाही. क्षमा करा! आपण ह्या मुलीला घेऊन सुखरूपपणे जावे. जातो आम्ही आत. अहिंसेची माळ जपण्याची आमची वेळ जवळ आली.
मुलगी : पण भिक्षूंनो, अहिंसेप्रमाणेच दया हेही तुमच व्रत नाही का? माझ्या दुःखाची-
शाकंभट : आम्हांला दया येते. पण मुली, तुला आम्ही सोडवली तर ह्यांचा क्रोध आणि सेनापति चंड यांचा काम अतृप्त राहिल्याने त्यांनाही दुःखच होईल. त्यांचीही दया यावयास नको काय? तुमच्या दोघांच्याही दुःखाची अशी दया येत असल्यामुळे आम्ही कोणाचेच दुःख दूर करण्याच्या भानगडीत पडत नाही. जातो आम्ही आत. दयेची माळ जपण्याची आमची वेळ जवळ आली!
सैनिक : हा कोण भिक्षुणीच्या मागंमाग दडत आहे? ओढा त्याला!

ताकंसिंह : मी तो! ह्या शाकंभटासारखा भागूबाई ब्राह्मण मी नव्हे, आपला क्षत्रिय. आपलाच जातभाई! हात जोडतो!

सैनिक : अरे अरे, एक वेळ तू असला कोणी मुर्दाड आणि बाष्फळ ब्राह्मण असतास तर तुला एक तुच्छ विदूषक म्हणून जिवंत सोडला असता; पण तू शाक्य क्षत्रिय! तुझे हे शाक्य राष्ट्र आज आम्हां कोसलांच्या घोड्यांच्या टापाखाली तुडविल जात असता राष्ट्राच्या पराजयाने क्रुद्ध होऊन रणात आमच्या विरुद्ध लढला असतास तरीही एक वेळ जिवंत सोडला असता. पण -

शाकंभट : पण तसे पहाल तर तो पूर्वी क्षत्रिय होता तेव्हा लढाईच जुंपली नव्हती. लढाई जुंपली तेव्हापासून तो भिक्षु आहे. आणि आम्हां भिक्षूंना जात नसते, राष्ट्र नसते. ह्या शाक्यांच्या आणि कोसलांच्या युद्धात कोणीही जय पावो! आम्हांस त्याचे काय? ज्याचा जय होईल त्यास आम्ही राजा म्हणू. ह्या पलीकडे त्या जयापजयाचे आम्हांस काहीच सोयरसुतक नाही. प्रत्यक्ष बुद्धाचीच आज्ञा आहे की संसार हे परम दुःख, त्यासाठी लढाईच पाप कोणचा शहाणा करील आणि ते केले तरी-

"जयो वैंर प्रसवति दुःखे शेते पराजितः ।

उपसन्तः सुखे शेते हित्वा जयपराजयम्"।।

म्हणून आम्ही सुखे शेते! सुखाने झोपत असतो!

सैनिक : हर हर! नीचांनो! मला बुद्धदेवांची सर्वच मते जरी संमत नसली तरी त्या तथागत महात्मा बुद्धाच्या हिमालयासारख्या स्थितप्रज्ञततून प्रसवलेल्या पवित्र वाग्भागीरथीचे हे तुषार ह्या नीचांच्या मनाच्या डबक्यात पडताच असे गलिच्छ झालेले पाहून मला देखील लाजेने मान वाकविल्यावाचून राहवत नाही. आता एका घटकेपूर्वी यःकश्चित् खडावांसाठी चोऱ्या करून ज्या तुम्हा दोघा भिक्षुकांस म्या लढताना पाहिले, त्या तुम्ही तुमच्या प्रत्यक्ष राष्ट्राचे आणि तुमच्या जातीचे वाटोळे होण्याचा प्रसंग गुदरला असता त्या लढाईत लढणे हे पाप आहे म्हणून म्हणताना ऐकून आणि त्या तुमच्या भ्याडपणास बुद्धाच्या अहिंसेच्या ढालेखाली लपविताना पाहून मला तुमचा एकदम शिरच्छेद करावासा वाटतो. ह्या अशा अहिंसाधर्माच्या अधर्माचा आम्ही राज्यातून समूळ नायनाट करणार आहोत.

शाकंभट नि ताकंसिंह : पण आम्ही भिक्षु आहेत, अवघ्य आहोत! आपण शास्त्र जाणताच! नैन छिन्दन्ति शस्त्राणि ।

सैनिक : मिथ्याचाऱ्यांनो, अशा मिथ्याचारी भिक्षूस भिक्षु म्हणूनच जिवंत ठेवणारा मी कोणी, दुष्ट दयेचे आणि अनर्थक अहिंसेचे ज्याला दोन लांब कान फुटले असा बुद्दू गाढव नाही समजलात! धरा रे ह्यांना, नाकात वेसणी घालून वेठीस धरा. आणि मग लढाईच्या तोंडावर उभे करून शत्रूंच्या शक्य तितक्या बाणांस व्यर्थ करण्यासाठी त्यांच्या ह्या देहांच्या चाळण्या होईतो ह्यांचा आडोसा करा.

ताकंसिंह : (शाकंभटाचे गळ्यात पडत) हाय रे मित्रा, मठात देखील क्षत्रियांचा पिच्छा मरण सोडीत नाही!

शाकंभट : तरीही हे क्षत्रिया, पहिल्याने तू रडू नयेस; प्रथम म्या ब्राह्मणाने रडावे आणि मग त्वा क्षत्रियाने हेल काढावे, हेच युक्त. अयायायी! अरे असे ढोसू नका. आता मात्र शाक्य राष्ट्रावर संकट आले आहे ह्यात शंका नाही रे बाबा! अयायायी! (सैनिक धक्के मारीत नेताना एकदम वळून) अरे, पण ती भिक्षुणी सोडलीत! तिला तरी घ्या बरोबर?

भिक्षुणी : इश्शऽऽ ग बाई, मेल्या तुझ्याबरोबर सती जायला मी कोणी तुझी लग्नाची बायको आहे की काय? इश्शऽऽ ग बाई! (जाते.)

प्रवेश ४ था

(समरसभा - विक्रमसिंह, सुलोचन (वेषांतरित सुलोचना आणि इतर दोन सेनानी.)

विक्रम : शाक्यांच्या उर्वरित शेवटच्या सैन्याचे सेनानायकहो, लढाईच्या भर रणधुमाळीतही ही त्वर्य समरसभा जी मी बोलाविली आहे तिचे मुख्य कारण म्हणजे आपला शत्रु जो कोसलेश्वर विद्युद्गर्भ त्याचे एक अत्यंत महत्वाच पत्र आपणांस आले आहे ते होय, हे आपण जाणतच आहा. त्या पत्राच उत्तर आपणांस ह्या क्षणी देलेच पाहिजे. त्या पत्राच्या उत्तराचा क्षण हाच बहुधा आपल्या शाक्यांच्या राष्ट्रीय जीवनाचा शेवटचा क्षण होणारा आहे! कारण विद्युद्गर्भाने धाडलेल्या ह्या पत्रातील मागणीप्रमाणे जर शस्त्रे खाली ठेवून विनाअट शरण जाणेच श्रेयस्कर असे तुम्ही ठरविलेत तर शाक्यांचे राज्य ह्या क्षणी मरण पावलेच. परंतु जरी तुम्ही तसे न ठरविता युद्ध चालू ठेवलेत तरीही फार तर आणखी चार सहा दिवस शाक्य टिकाव धरू शकतील इतकेच काय ते. कारण फारा दिवसांच्या शस्त्रबळाच्या केलेल्या राष्ट्रीय उपेक्षेच्या पापाचे प्राणघातक परिणाम आता आयत्या वेळी तुम्ही किंवा मी कितीही धडपड केली तरी - आम्हास भोगल्यावाचून गत्यंतर नाही! विद्युद्गर्भाचे हे मुख्य सैन्य जरी आपण येथे अडवून धरले आहे तरीही त्याच्यापाशी अनेक उपसैन्ये आहेत. त्यापैंकीच एक आपल्या राजधानीवर चढून चालले आहे ही गुप्त बातमी आपणांस आताच कळली आहे. तेव्हा आपण युद्ध चालू ठेवलेत तरीही विजय मिळणे शक्य नाही. केवळ शत्रूस तो विजय सहजासहजी न मिळू देता आपण पूर्ण मरण्याचे आधी त्यासही अर्धमेला करून सोडणे - इतकेच समाधान आता आपल्याला मिळणार आहे. आणि तेही वीरोचित कर्तव्य आहे तेव्हा बोला. ह्या क्षणी तुम्ही जो निर्णय बोलाल ते ह्या आपल्या राष्ट्राचे शेवटचे वाक्य होणार आहे; हे चिरंतन उत्तरदायित्व लक्षात बाळगून काय ते बोला. विद्युद्गर्भाचे पहिले विधेय हे आहे की, बुद्ध भगवानाविषयी त्याला फार पूज्यबुद्धि वाटते. कारण बुद्धांनी शस्त्रन्यास, अहिंसा नि दया ह्या तत्वांचा केवळ उपदेशच केला नाही तर आजूबाजूस युद्धाचा असा वणवा पेटला असताही ते जगाच्या जंजालात न फसता तत्वांचे आचरण स्थिरनिष्ठेने जसेच्या तसेच करीत आहेत. त्यांची ही शस्त्रन्यासी संन्यासनिष्ठा अत्यंत आदरणीय आहे. बुद्ध जगातील थोर व्यक्ति आहे.

पहिला सरदार : जर तो शस्त्रन्यास विद्युद्गर्भाला खराच अभिनंदनीय वाटते असेल तर प्रथमतः, त्यानेच आजच्या आज दयेची हिंसा करण्याचे सोडून तसला शस्त्रसंन्यास घेण्याची दया करावी!

सुलोचन : एका अर्थी शस्त्रन्यास आदरणीय आहेच. शाक्य तर त्यास आता अनुकरणीयही समजू लागले आहेत. कारण दुष्टाच्या कंठाचा अचूक छेद करणारा जो शस्त्राचा न्यास - म्हणजे फेक तो शस्त्रन्यास. ती बाणाची फेक, तो पट्ट्याचा वार, तो खड्गाचा आघात आम्हांसही आदरणीय वाटते आहे. आम्ही त्याचेच अनुकरण करणार.

विक्रम : विद्युद्गर्भाच्या ह्या अंतिमोत्तरातील दुसरे विधेय हे की, बुद्धांच्या ह्या आदरणीय व्रतापासून मी चळलो, संन्यासी असताही शस्त्रन्यासाची प्रतिज्ञा भंग करून हिंसामय युद्धात शस्त्र धरून निघालो त्या मला ह्या बुद्धाज्ञाभंगाविषयी आणि व्रतच्युतीविषयी आपण कठोर दंड द्यावा.
सुलोचन : दिलाच की दंड. कठोरातील कठोरतम दंड, आपल्या शस्त्रधारणाच्या सिद्धतेसरशी, हे सशस्त्र संन्यासिन्, आपणास शाक्यांनी दिलाच आहे. कारण सर्व दंडांची प्रत्यक्ष संहतमूर्ति असलेला राजदंडच शाक्यांनी आपणांस अर्पिला आणि आपणांस राष्ट्राचे सर्वाधिकारी अनन्य शास्ते नेमिले.
पहिला सरदार : हे तरुण वीरा, तू अगदी ठीक बोललास. आणि तो राजदंड सशस्त्र संन्याशास देण्यातच विद्युद्गर्भ म्हणतो तसे सेनापतिच नव्हेत तर आम्हीही थोडेसे व्रतच्युत झालो आहोत खरेच. कारण एका वल्लभाचा अपवाद सोडला असता कोसलांच्या अकस्मात् छाप्यामुळे गांगरून जाऊन एकही लढाई न देता, शस्त्रबळास हीन लेखणाऱ्या आणि म्हणूनच हीनतर झालेल्या आम्ही शाक्यांनी शत्रूपुढे सारखा पळ काढण्याचे आणि केवळ मारले जाण्याचे जे व्रत धरले होते ते हा संन्याशी सेनापति विक्रमसिंह समरात उतरताच आम्ही पाळीनासे झालो. हे वीरवर, तुम्ही आलात म्हणून आज चार दिवस तरी ह्या कोसलच्या सैन्याचा जो आम्ही यथेच्छ फडशा पाडू शकलो, त्या क्रूरकर्म्या विद्युद्गर्भाची नांगीही जी थोडीफार ठेचू शकलो ती आमची व्रतच्युति झाली खरीच!
दुसरा सरदार : भगवान् बुद्ध जगांतील अत्यंत श्रेष्ठ मनुष्य आहेत हीच गोष्ट त्याच बुद्धांवर चारदा मारेकरी घालणारे त्यांचे हे शत्रुच जेव्हा बळे बळे सांगत पुढे येतात तेव्हा हेच स्पष्ट होते की, निष्प्रतिकारी आत्यंतिक अहिंसा ह्या हिसकांच्या पथ्यावर पडते. तो आम्हांपुढे तेवढा बुद्धांचा आदर्श ठेवतो, स्वतःपुढे नव्हे! आम्ही सर्वच असे अप्रतिकारी बुद्ध संन्याशी झालो तर ही शाक्य वसुंधरा त्याच्या आयतीच पदरात पडणार. आणि तुमच्या मनासारख्या प्रतिकारी सशस्त्र अहिंसेचे अनुयायी झालो तर ती पूर्वी त्याच्या बापास जशी हिंसकता आली नाही तशी ह्या विद्युद्गर्भालाही येणार नाही. म्हणून तो आमच्या मनात आपल्याविषयी अनादर उत्पन्न करू पाहतो, आणि बुद्धाचे ढोंगी स्तोम माजवतो. विद्युद्गर्भास म्हणाव, बुद्ध जगातील अत्यंत श्रेष्ठ पुरुष आहेत ना? तर मग स्वतःच अहिंसाव्रती होऊन आणि संन्यास घेऊन त्यांचा शिष्य हो बापडा!
विक्रम : आता ह्या दोन प्रास्ताविक विधेयांनंतर विद्युद्गर्भाच्या अंतिमोत्तरातील जे मुख्य विधेय त्यावर मी आपले मत मागतो. जर शाक्य आताचे आत्ता बिनअट शरणचिठ्ठी धाडतील आणि राज्य विद्युद्गर्भाचे स्वाधीन करतील तर बरे. नाही तर त्यांच्या हाती पडलेल्या सेनापति वल्लभाचा तत्काल शिरच्छेद करून, तो म्हणतो, आजवर शाक्यांस मी दिला हा दंड काहीच नव्हे असा अत्युग्र दंड तुमची राजधानी हातात पडताच तुम्हांस देईन! मुलालेकरांसुद्धा शाक्यांची शाका करीन. ह्या त्याच्या भयंकर धमकीला काय उत्तर धाडावे ते सांगा. वल्लभ माझा मुलगा म्हणून अशा प्रसंगी माझे मन ममतेने विचलित होणे मानवी निसर्ग आहे. माझ्या मताचा परिणाम आपल्यावर होईल, म्हणून मी या निर्णयात कोणतेही मत न देता तुमच्या बहुमताप्रमाणेच निर्णय

देणार आहे. जर क्वचित् तुमचे निर्णयात्मक असे काहीच सांघिक मत झाले नाही तरच मी माझे सर्वाधिकारित्वाचे अधिकारी मतच निर्णयात्मक मत म्हणून समजेन. सभ्यहो, ही एक वेळ एका राष्ट्राच्या सर्वस्वनाशाची आहे. तेव्हा अविचारी वीरता किंवा अविचारी भीरुता ह्या दोन्ही दुर्वृत्तींकडे तोल झुकू न देता जे बोलणे ते स्पष्ट बोला.

पहिला सरदार : सेनापति, ह्या तीन दिवसांच्या निकटच्या झुंजीनंतर मी हे सांगणे नकोच की, मी स्वतःच्या मरणास भीत नाही. माझीं चार मुले माझ्या समक्ष मी मोजून मोजून ह्या रणांत झुंजवली; मारली जाताना पाहिली. पण आता ही माझी शाक्य जातची जात मारली जातांना ह्या डोळ्यांनी पहावी किंवा नाही हा प्रश्न मजपुढे आहे! सेनापते, आपण ह्यापुढे लढलो तरीही राजधानी पडणारच; शत्रु अत्यंत प्रबळ, मानवी प्रयत्नांच्या पलीकडची गोष्ट कोण साधू शकणार? गेल्या तीन चार दिवसांत पराक्रमाची पराकाष्ठा करावयाची ती केली. पण आता प्रतिकाराची आशा लवलेशही उरली नसता केवळ आपण मरणासाठी मरून ह्या सहस्त्रावधि अनाथ नि असहाय शाक्य प्रजेचा प्राणनाश करणे जवळ जवळ पापच होणारे आहे, असे माझे मत होत आहे. मग मला ही किंवा पुढील एखादी पिढी भ्याड म्हणून म्हणाली तरी चालेल! केवळ स्वतःला वीर म्हणवून घेण्यासाठीच राष्ट्रातील हजारो माणसांची कत्तल उडविण्यास कारणीभूत होणारी देशवीरता, देशवीरता नसून देशद्रोह होय! रणाने शाक्याचे हित साधणे शक्य होते तोवर मी रण मांडिले. आता शत्रूस शरण जाण्यानेच शाक्यांची दुर्दशा काही अंशी तरी टळणारी असल्याने विद्युद्गर्भाला तसे बिनाअट शरण जाणे हेच मी आपले खरे कर्तव्य समजतो.

दुसरा सरदार : ह्या अभिजात शाक्य सरदारांनाही शाक्यांनी शरण जाण्यावाचून जर अन्य मार्ग दिसत नाही तर मी तरी अधिक काय सांगणार?

विक्रम : आपले दोघांच मत तेच बहुमत होणार. तोच निर्णय, तेव्हा शरण जाणे योग्य ना?

दुसरा सरदार : छे, छे मी ते योग्य म्हणत नाही! ते अपरिहार्य आहे इतकेच म्हणतो. शरण जाणे योग्य कसे म्हणू! अहो शाक्यांनी शरण जाणे म्हणजे हे आमचे राज्य, हे प्राजक, हे गणतंत्र, ह्यांचा सूर्यवंशाच्या अक्ष्वाकूंच्या शाखेचा राजवेष उतरून घ्यायचा. बावन पिढ्यांचा हा राजमुकुट विद्युद्गर्भाच्या लाथेने आमच्या मस्तकावरून खाली कोलमडत जायचा. बायाबापुड्यांस यात्रेच्या प्रसंगी पाहण्यास मिळण्यासारखे एक खेळणे म्हणून तो कोसलच्या राजधानीत कुठल्या तरी प्रदर्शनात ठेवला जायचा! म्हणजे शरण जाणे. आम्हांला दाव्याला बांधून किंवा पहाऱ्यात घेऊन विद्युद्गर्भाचे पुढे नेले जाणार, विद्युद्गर्भ मिशांना पीळ भरीत म्हणणार, काय रे! भामट्यांनो! थकलात का लढून? आणि त्याच्या रागीट लाथेच्या धक्क्यासरशी दूर धडपडत जावयाचे! जगाच्या हाटाहाटांतून आणि चौकाचौकांतून लोक म्हणायचे 'ते शाक्यांचे राज्य बुडाले! गाढव कुठले! जगात अहिंसा स्थापू गेले आणि आत्म्याचीच हिंसा करून बसले! एक देखील लढाई न देता राज्य बुडवून टाकले! भागूबाई कुठले!' आणि ते शब्द मी जाऊ तेथे ऐकू! छट, शरण जाणे योग्य नाही, ते योग्य नाही, ते योग्य नाही आणि अपरिहार्य असले तरी चिंता नाही. पण मग वल्लभासारखा

मोहरा ह्या शरण न जाण्याच्या पोकळ डौलापायी मरू द्यावा? पोकळ ऐट कारण नाही तरी ते शाक्यांचे छत्र, तो राजवाडा, तो मुकुट हे विद्युद्गर्भाच्या विजयी घोड्याच्या टाचेखाली चूर्ण होणारच. जग शाक्य राष्ट्र मेले म्हणून म्हणणारच मग त्या वल्लभाचा तरी बळी का द्यावा, कोणच्या तोंडाने द्यावा? वल्लभ तो आमचा पराक्रमी सेनापति, शाक्याचे गांगरलेले, अस्ताव्यस्त झालेले सैन्यच शक्य तो झुंजवून, शत्रूची लाट थोपवून शेवटी सर्वोपाय हरले तेव्हा हाणा, मारा करीत जातीनिशी शत्रूवर तुटून पडणारा आणि घेरला जाऊन पाडाव होईतो झुंजणारा शाक्य वीर वल्लभ त्याचा शिरच्छेद तू सुखाने कर, असा शाक्यांनी विद्युद्गर्भाला कृतघ्न संदेश धाडावयाचा? अशा विश्वासघाताने वल्लभाच्या त्या प्रेमळ आणि तरुण अंगनेची मान कापून तिला तोंड तरी कसे दाखवू! तुमचे घर हुतात्म्यांच्या तीन पिढ्यांचे ऋण आपल्या घराण्याचे निःसंतान करून फेडू! आणि शाक्यांच्या उरलेल्या जातीची शत्रु चिडून राखरांगोळी करील तीस कारणीभूत होऊ! केवळ पोकळ ऐटीसाठी! छट् सेनापते! शरणच जावे! नाही, शरण जाऊ नये! दोन्हीही मार्ग सारखेच त्याज्य; सारखेच ग्राह्य. ठरवू तरी काय? पितामह, मी सर्व तुम्हांवर सोपवितो. मला मतच नाही. तुमचे मत तेच माझे मत.

विक्रम : हे तरुण वीरवरा, आता तू काय ते बोल. ह्या तीन दिवसांपूर्वी तू एक अज्ञात सैनिक म्हणून सेनेत शिरलास. या तीन दिवसांत तू जी शौर्याची पराकाष्ठा केलीस, तुझ्या घोड्याची ती बिजली फेक, बाणांचा तो अचूक लक्ष्यभेद आणि मनाचे ते निष्ठुर साहस ह्यांच्या योगाने तू तीन दिवसांत सैनिकाचा सेनानी झालास. शाक्यांतल्या तरुण पिढीचा मी तुला प्रतिनिधिच समजतो. बोल. आता तुझ्या मतावर सर्व निर्णय अवलंबून आहे. कारण तुम्हा तिघांपैकी एकाने मतच दिले नाही. एकाने शरण जाणेच युक्त हे मत दिले. आता तूही जर तेच मत देशील तर तुमच्या बहुमताने शरण जाणे हाच निर्णय ठरेल. सेनापति वल्लभाचा प्राण आता विद्युद्गर्भाच्या तरवारीवर अवलंबून नसून तुझ्या जिभेवर अवलंबून आहे. वल्लभाची तरुण दयिता त्याची वाट पाहत व्याकुळतेने दाराशी उभी आहे, तिला आठव. राजधानीतील शाक्यांची मुलेमाणसे दिसली की, कापीत कोसलची शेकडों लालभडक खड्गं शाक्यांच्या राजधानीत रक्ताच्या निशेने झिंगून मार्गोमार्गी घुसताहेत असे चित्र समोर रेखाट! मग बोल. तुझ्या तारुण्यसुलभ वृत्तीचा ओढा चटकन् प्रक्षुब्ध वीरास साजेल अशी युद्ध! युद्ध!! म्हणून गर्जना करीत उठेल. ती बाजू तुझी स्वाभाविक प्रवृत्तीच असणार म्हणून मी तुझ्या त्या तेजस्वी प्रक्षोभास पायबंद घालण्यासाठी ह्या दुसऱ्या उलट पक्षाचे इंगितच अधिक विस्ताराने मांडतो आहे. आता काय ते निश्चित सांगून टाक.

सुलोचन : राष्ट्र पितामह सर्वाधिकारिन्, माझे निश्चित मत मी सुस्पष्ट शब्दांत सांगतो. अवधारावे! आपण आज शस्त्रे खाली ठेवून बिनअट शरण गेलो तर विद्युद्गर्भ आम्हांस कोणते विशिष्ट वरदान देणार आहे ते त्याच्या पत्रात मला मुळीच आढळत नाही. तो राजधानी घेणारच. शाक्यांचे राज्य बुडविणार, शाक्यांच्या मुकुटाचे कोसलच्या सिंहासनास पादपीठ करणारच. इतकेच नव्हे तर आजवर शाक्यांच्या गावांस आग लावीत, सरसहा कापाकापी करीत, देश उजाड करीत

जसा तो इथवर चालून आला तीच दशा तो पुढे चालून राजधानी घेतल्यानंतरही करणार नाहीच असे काही वचन त्या पत्रात तो देत नाही हे माझ्या या दोघां वरिष्ठ सेनानींच्या ध्यानात आलेले नसावे. म्हणून शरण गेल्यास राष्ट्रावर असा कहर ह्यापुढे गुदरणार नाही असे ते समजले. परंतु आजवर झाला तसा कहर मी पुढे उडविणार नाही असे विद्युद्गर्भ म्हणत नाही. तो त्या पत्रात जे म्हणतो ते इतकेच की जर तुम्ही शरण आला नाही तर आजवरच्या कहरातून अधिक भयंकर कहर तुमच्यावर गुदरेल! पण आजपर्यंतच्या छळाहून अधिक भयंकर कहर असणार तरी कोणता? पुन्हा हेही ध्यानात धरा की ज्या विद्युद्गर्भाने इकडे सामाचे बोलणे काढून त्यामुळे अधिक असावध झालेल्या शाक्यांवर ही जशी अधिक हिस्त्रकर्मी चाल अचानक केली त्याचे वचन म्हणजेच वंचना होय. तेव्हा परिस्थिति थोडक्यात अशी आहे; शाक्य राष्ट्र नाश होणार हे बहुतेक निश्चित. विजयाची आशा सुटली; पण तरीही अजून शाक्यांस एक आशा आहे. ती म्हणजे सूडाची. मरण टाळणे अशक्य आहे पण तरीही एक गोष्ट शक्य आहे. ती म्हणजे मारीत मारीत मरणे!

पहिला सरदार : ही तुमची वृत्ति म्हणजे केवळ क्रोधाची अंध प्रतिक्रिया आहे.

सुलोचन : आहेच ती तशी. पण ही दलित क्रोधाची प्रतिक्रियाच उन्मादाच्या हत्तीचा अंकुश असते. सापाच्या शेपटीवर पाय पडला तर साप चटकन् उलटून दंश घेतो, नि आपण मरता मरता शत्रूस मरणोन्मुख करून सोडतो तो काही विजयासाठी नव्हे, तर सूडासाठी आणि सापाची जात अशी सूड घेणारी आहे, अशी मनुष्यास धास्ती असल्याने मुंगीस किंवा बागुरड्यास मुलेही जशी सहज चिरडतात तशी माणसे सापास चिरडू धजत नाहीत. वाघास बाण लागून तो घायाळ तरीही केवळ या निराशप्रतिक्रियेच्या आवेशाने उडी घेऊन मृगयूच्या नरडीस दात देतो. तो वाघ मरतो; तरीही वाघाचा हा सूडघेऊ प्रतिक्रियेचा स्वभाव पाहून वाटेल तो मनुष्य वाघाच्या मृगयेस सशाच्या मृगयेसारखा सहज गमतीने जात नाही. मुंगी ती काय! मनुष्याच्या पायास डसते तेव्हा तिला पक्के माहीत असते की ह्या डसण्याने मी व्यक्तिशः वाचत नाही. पण ती जगण्यासाठी डसत नाही, तर आपल्याला मारण्याचा काही तरी दंड मारणारालाही भोगावा लागावाच म्हणून डसते. ती डसकी मुंगी मरते. पण पुन्हा तिच्या जातीच्या तशा डसक्या मुंग्यांच्या वारूळात मनुष्य तर काय साप देखील सहसा घुसत नाही! मधमाशांची एक जात आहे. त्यांचे मोहेळ पाडताच त्या मधाचा नाद सोडतात, आपल्या इतर माशांचे काय होईल ही चिंताही बाळगीत नाहीत. तर एकेकटी जी माशी असेल ती तशीच त्या मोहोळ उडविणाऱ्या माणसास गावोगाव पाठलागीत जाते, डसते, तेव्हा तिची नांगी त्या माणसाच्या अंगांत इतकी पक्की रुजते की तिला परतता येत नाही. ती तिथेच मारली जाते. पण तरीही जाणूनबुजून तसे मरण्यास जाते. कारण सूड घेत मरण्याचे समाधान अपमानित जीवनाच्या समाधानाहून तिला अधिक आनंद देते. त्यामुळे रेशमी किड्यांच्या उभ्या वसाहतीस मनुष्य कधीही जितका भीत नाही तितका त्या मधमाशांच्या एकेका माशीस भितो. प्राणिमात्राच्या क्रोधास ही जी निसर्गानेच सूडाची नांगी ठेवली आहे तिच्यात हा असा दैवी हेतु

असतो की, ही सूडाची प्रवृत्ति आततायी आक्रमणास त्याचे पापी अपहरण सहसा अगदीच स्वस्त पडू देत नाही. त्यामुळे तो आततायी कर्मे करण्यास तितक्या निर्भय वेगाने धावत नाही की, जितक्या तो सूडाचे भय नसते तर धावला असता. आततायी पीडेपासून त्या प्रमाणात उरलेले जग अधिक सुरक्षित राहते म्हणून जर आता शाक्य राष्ट्र मरणेच अनिवार्य आहे तर स्वतःच्या जगण्यासाठी नसले तरी निदान उरलेल्या जगाने जगावे म्हणून तरी शाक्यांनी विद्युद्गर्भावर वाघासारखे तुटून पडावे, एकेका शाक्याने निदान पांच पांच क्रूरकर्मी कोसलांचे क्रंदन करीत दंड देत देत सूड घेत घेत मरावे म्हणजे हा विद्युद्गर्भ आपल्यासारख्या इतर लहान सहान प्रमुख प्राजकांवर तरी ह्यापुढे असा सशस्त्र छापा घालू धजणार नाही, त्यास इतके सहज विजय संपादणे शक्य होणार नाही! अशा वेळीं सूड ही नुसती उपजत प्रतिक्रियाच नव्हे तर परोपकारक कर्तव्य आहे. म्हणून माझे आपल्या प्रश्नास अगदी निःसंशय असे एकच उत्तर आहे की शरण नव्हे, सूड!
विक्रम : हे तरुण वीरवरा, तुझ्या निर्णयास बाधा करण्यासाठी नव्हे तर ज्या वीरोचित आणि उत्स्फूर्त युक्तिवादाने तू त्या निर्णयाचे समर्थन केलेस त्यात लेशही कमीपणा येऊ नये म्हणून मी एक चेतावणी देतो की तू इतर सर्व कार्यकारणे विचारात घेतली असता एक महत्वाची गोष्ट अगदीच गाळलीस. आम्ही शस्त्र खाली ठेवीत नाही. आमचे उत्तर शरण नाही. सूड! ह्या तुझ्या निर्णयाचा ध्वनि त्या दुष्ट विद्युद्गर्भाचे कानी पडताच त्याच्या प्रतिध्वनीच्या भयंकर आघातासरशी वल्लभाच्या मानेवर त्या दुष्ट विद्युद्गर्भाची तरवारही पडून त्याचे शिर तत्काळ तुटणार आहे! ह्याचा तुला विसर पडला नाहीना? तू त्या एका परिणामास मुळीस महत्व देत नसशील तर गोष्टच वेगळी.
सुलोचन : राष्ट्रांराष्ट्रांच्या चिरंतन हानिलाभांच्या विचारात व्यक्तीस कोण मोजतो! पितामह तो विचार विचारात घेण्याचा अविचार मी करू शकत नाही.
पहिला सरदार : अशा एका अज्ञात युवकाला विचार काय नि अविचार काय! त्यास सेनापति वल्लभाच महत्व काय कळणार! तू वीर आहेस पण कोठल्या तरी खेड्यापाड्यात राहणारा तू एक राजकारणाशी अरपरिचित असा अजाण युवक आहेस. वीरयुवका, तू त्या धैर्यधुरंधर सेनापति वल्लभाला कधी पाहिले तरी आहेस का? अरे, त्याचे ते प्रियदर्शी दिव्य मुखमंडळ जर तू पाहिले असतेस तर हाय, तुझ्या ह्या निर्णयाच्या शब्दासरशी तुटून ते तेजस्वी मुखमंडळ त्या दुष्ट विद्युद्गर्भाच्या कुऱ्हाडीच्या घावासरशी तुटून खाली कोसळत आहे असे तुझ्या मनश्चक्षूस दिसून तुला भोवळ आली असती. व्यक्तीस कोण मोजतो? अरे पण राष्ट्र राष्ट्र म्हणजे काही आकाशात तरंगणारा कोणी स्वतंत्र पदार्थ नाही! व्यक्तीचे राष्ट्र आणि त्यातही असामान्य वैयक्तिक थोरवी आणि ती राष्ट्रीय सेनापतित्वाचा अधिकार यांहीकरून अंकित असलेली सेनापति वल्लभासारखी व्यक्ति म्हणजेच राष्ट्राची एक मूर्तिमंत अभिव्यक्ति असते! ज्या ह्या दोन वंशांचा इतिहास म्हणजेच शाक्यांचा गेल्या तीन शतकांतील इतिहास होत आहे त्यांपैकी एक म्हणजे आमचा राजवंश; तो भगवान् बुद्धांच्या संन्यासवादी जिव्हेने छाटून निर्वंश करून टाकला, शाक्यांच्या

राजवंशाचे खालोखालचा हा दुसरा राष्ट्रीय वंश या पितामहांची कुलपरंपरा. तो वंश आज तुझ्या या शस्त्रवादी जिव्हेने छाटला जाऊन निर्वंश होत आहे. हाय हाय आणि ती बघ वल्लभाची तरुण नववधू सुलोचना! महाराज ती माझी भाची आहे. लहान असता पाहिली होती. चांदणीसारखी चमके! पुढे आम्ही दूरदेशी गेल्यान ती पुन्हा भेटली नाही. तिच्या वयास विशीदेखील उलटली नाही. तिच्या प्रीतिविवाहास अजून पुरते वर्ष देखील उलटले असेल नसेल! तिच्या यौवनलतिकेस मोहोराचा पहिला बहार देखील अजून लहडला नाही तोच तिच्या सुखाशेचे कोवळे कुंकू पुसून टाकण्यास तू धजतोस तरी कसा! त्या कोमल मनाच्या कन्यकेचा असा केसाने गळा कापू नकोस! तरुणा, तुझे या जगात कोणी प्रियकर माणूस की जे न भेटले असता तुझा जीव तळमळू लागतो असे आहे का? असेल तर ती जिवलग मूर्ति डोळ्यांपुढे आण. नंतर लगेच त्या जिवलगाचे प्रिय मुखमंडल कंठनालापासून कसायाच्या कुऱ्हाडीच्या घावाने खाड्कन तुटले आणि रक्ताच्या जाड चिळकांड्या उसळून उडाल्या असे घोर दृश्य समोर आण; आणि त्या दृश्याच्या काल्पनिक वेदनांसरशी तुझ्या मनास जी विव्हलता व्याकुल करील त्याच्या शतपटीने वल्लभाच्या प्रत्यक्ष शिरच्छेदाची वार्ता ऐकताच त्याची जिवलग नववधू सुलोचना विव्हल होईल ते आठव आणि मग काय ते बोल! याहून मी अधिक काय सांगू!

सुलोचन : मी मघाच सांगितले की, राष्ट्रीय किंवा जागतिक हिताहिती व्यक्तीच्या सुखदुःखाचा प्रश्न गौण आहे. पण त्या गौण प्रश्नावरही जर माझे मत मागत असाल तर मी विचारतो की, आम्ही शस्त्रे खाली ठेवली आणि शत्रूने क्वचित् वल्लभास जिवंत ठेविलेच तरी तो कशासाठी ठेवील? हे शाक्य राष्ट्र ठार मारून तो विद्युद्गर्भ जेव्हा कोसलला परत जाईल तेव्हा त्याच्या विजयी रथाच्या पुढे त्या वल्लभाची शाक्यांचा विजित सेनापति म्हणून धिंड काढण्यासाठीच ना? दात पाडलेला वाघ बायकामुलात दाखवीत फिरतात तसे फिरण्यासाठीच ना? अशा जीवनीय दुर्दशेहून त्या मानी सेनापति वल्लभास हे मरणीय हौतात्म्य अधिक वांछनीय वाटत असेल असे मला तरी वाटते. सरदार, आहे माझेही ह्या जगात एक जिवलग माणूस अजून आहे. (गहिवरून) त्याची भेट मला पुन्हा कधीही होणार नाही अशा भीषण संकटात मी त्याला ज्या ज्या कारणासाठी राष्ट्रहितार्थ ढकलून जितक्या लौकर त्याच्या शिरच्छेदाला अनुमति देईन, देवा, त्याच त्याच कारणासाठी, तितक्याच लवकर आज मी माझ्या वल्लभाच्या माझ्या प्रियकराच्या सेनापति (गोंधळून) महाराज, मला क्षमा करा! ह्या व्यक्तिविषयक प्रश्नात मला पाडू नका! वल्लभांची नववधू दारात उभी राहून त्यांची वाट पाहत असेल! तिने तिथे मुळुमुळू रडत मलिन वदन होऊन बसण्यापेक्षा शत्रूच्या रक्तात न्हाऊन धुऊन, आपल्या पतीच्या सूडाची मशाल चेतवून, विरहाच्या अंधःकारातून प्रियकर गेला ती वाट काढावी आणि त्यास जाऊन भेटावे.

पहिला सरदार : तरुण सेनाने, हे तुझे कठोर भाषण एखाद्या नाटकातील वीररसाचा आविर्भाव आणणाऱ्या कोण्या नाटकी नायिकेचे समाधान करू शकते. पण मुलीचे हृदय, वास्तविकता, किती कोमल आणि स्नेहदुर्बल असते ह्याची तुला काय कल्पना असणार! मनाला विचार की, जर ती

वल्लभाची नववधू तुला आता प्रत्यक्ष भेटली आणि आपल्या शोकाकुल अलकांना मागे सारीत नि भरून आलेल्या अश्रूंच्या पटलातून तुला कसाबसा पाहत म्हणाली, 'मारू नकोस माझ्या दयिताला राष्ट्रासाठी नव्हे, कारण राष्ट्र तगत नाहीच; पण केवळ लोकानी तुला वीररसाचा भाषणे करणारा उत्तम नट म्हणून टाळ्या पिटाव्या एवढ्यासाठीच केवळ माझ्या प्रियकराला मरणाच्या दारी ढकलू नकोस. करुणेचा एक तरी अश्रू गळू दे!' तर तू तिचे समाधान काय सांगून करशील?

सुलोचन : असे सांगून की, मुली आज ह्या शाक्य राष्ट्राच्या प्रत्येक दुसऱ्या घराच्या दारात तुझ्यासारखी कोणती तरी नववधू विद्युद्गर्भाने मारलेल्या तिच्या कोणातरी प्रियकराच्या हत्येची बातमी ऐकून शोकावेगाने केस ओढीत ओक्साबोक्शी रडत बसली आहे. त्या सर्वांच्या एकत्रित दुःखासाठी रडता रडता शाक्य राष्ट्राच्या डोळ्यात तुझ्या एकटीच्या शोकासाठी निराळा म्हणून गाळण्यास करूणेच्या आसवांचा एकही बिंदु उरला नाही! पितामह, अवघ्या चारपांच दिवसांपूर्वी, या सैन्यात येण्यापूर्वी मीही अशीच दारात - उभी - उभा राहून मी त्या माझ्या जिवलगाची वाट पहात होत्ये - (हुंदके देत गांगरून स्वगत) -अग बाई मी काय बोलल्ये. माझ्या मनाने बंड केले! बंदीतून निसटू पहाते! विवेका पहारेकरी, पकडा याला!

विक्रम : म्हणजे, म्हणजे! वीरयुवका, तू चलबिचल कसा होतोस! स्थिर हो आणि मनास काय वाटते ते स्पष्ट सांग!

सुलोचन : (सावरून) महाराज, क्षमा करा! माझी भाषा थोडी वहावली. काय, माझे मन काय म्हणते विचारलेत! पण समरांगणात उतरण्याचे आधी अंतस्थ बंडखोरास राजे बंदीत टाकतात तसे माझ्या मनास बुद्धीने बंदीत टाकून त्याचे तोंडास मोहोर ठोकली आणि विवेकाचा खडा पहारा उभा केला म्हणून माझे मनास आता मतच नाही, मला मत आहे आणि ते मी शाक्य राष्ट्राचा एक सैनिक ह्या नात्याने सुस्पष्टपणे देत आहे की एका सेनापति वल्लभाच्या प्राणासाठी राष्ट्राच्या जीवनासच नव्हे तर स्मृतीसही भ्याड शरणागतीचा चिरंतन काळिमा लावण्यापेक्षा त्या वल्लभाच्या आणि आपल्या सर्वांच्या प्राणांचा बळी शत्रूचा नुसता फडशा पाडीत पाडीत रणांगणात अभिमुख आघाती व्हावा, हेच मला युक्त दिसते. माझी निश्चिति आहे की स्वतः वल्लभ पितामहांचा पुत्र आहे, स्वभावाचा वीर आहे, शाक्यांचा सेनापति आहे, एका वीरांगनेचा वल्लभ आहे! मी त्यांच्या शिरच्छेदास एवढ्याचसाठी संमति देतो की जर आपण शरण गेलो आणि वल्लभ क्वचित् सुटून आले, तर ते सेनापति स्वतः त्यांच्या अशा शिरच्छेदास आपण भ्यालो म्हणून आपलाच शिरच्छेद करण्यास सोडणार नाहीत. शरण नाही, रण हाच माझा शेवटचा शब्द?

विक्रम : साधु! साधु!! हे तरुण संसारी वीरा, तू आम्हा वृद्ध संन्यासी धीरांना मनोनिग्रहात लाजेने खाली मान घालावयाला लावलीस खरी! अहो, मनुष्य आपल्या हातातील चिंध्यांचा चेंडू जसा सहज फेकून देतो तसा जो संसारी वीर आपल्या धर्मार्थ, आपल्या राष्ट्रार्थ, परोपकारी न्याय्यबुद्धीं आपले शिर हातावर घेऊन फेकून देतो त्याहून अधिक जितेंद्रिय, अधिक निस्संग, अधिक निर्लिप्त असा कोणता संन्यासी असू शकणार आहे! ऐका, सेनानींनो, ह्या समरसभेचा शेवटचा शब्द ऐका! जर

हा तरुण सेनापति शरणागतीस संमति देता तर दोन मते तिकडे पडून तेच बहुमत निर्णयात्मक झाले असते. पण त्याचा शेवटचा शब्द रण असा आल्याने आणि एकाने मतच न दिल्याने तुमच्यांत दोन्ही पत्री एकेकच मत पडून शेवटचा निर्णय माझ्या मनावर अवलंबून राहतो. ह्यास्तव मी तो निर्णय असा देतो की ह्या तरुण वीराच्या शेवटच्या शब्दाप्रमाणेच शाक्यांचाही शेवटचा शब्द हाच राहणार की शरण नाही, रण! चला, उद्या सकाळपर्यंत आज चार दिवस सारख्या झुंजत असलेल्या आपल्या सैन्यास विश्राम द्या आणि उद्या आकाशातून वज्र तुटून पडावे तसे शत्रूवर तुटून पडा. शाक्यांचा शेवटचा शब्द उच्चारीत चला. करा ही समरसभा विसर्जन!
सर्वजण : शरण नाही रण! शरण नाही रण! मारीत मारीत मरण!

प्रवेश ५ वा

(पुरुष वेषात सुलोचना आणि नलिनी.)

सुलोचना : (इकडे तिकडे बघत) नलिनी, बघ बघ माझ्या हृदयावर रक्ताचे डाग दिसताहेत का? मी एक अघोर हत्या करून आले आहे!

नलिनी : हे काय बाई महाराज! आज तीन दिवस आपण रणांगणावरून येताना देशशत्रूंच्या रक्तात नुसत्या न्हाऊन निघालेल्या असता! अशा परम प्रतापी झुंजत्या वीरांगनेची वक्षावरील वस्त्रं विपक्षाच्या रक्ताने रंगून लालभडक झालेली असणारच!

सुलोचना : अग, वक्षावरील वस्त्रं नव्हत ग! वक्षाचे आतील हृदय बघ! प्रत्यही राष्ट्ररिपु विद्युद्गर्भाच्या आततायी सैन्याची छाटाछाट करताना त्यांच्या रक्ताच्या चिळकांड्यांनी वक्षावरील वस्त्रं लालभडक होत, पण त्याचा एकही डाग हृदयाच्या विमल धवलतेवर पडत नसे. पण आज, आज नलिनी मी एका अत्यंत निरपराधी निष्पापाची हत्या करून आलेली आहे. दुष्टाचा गुप्त वा प्रकट वध नव्हे तर सुष्टाची, माझ्या मांडीवर विश्वासाने निजताना मान ठेवलेल्याची गुप्त हत्या! त्या रक्ताचे डाग माझ्या हृदयावर उडाले आहेत असे मला वाटते! त्या भयंकर हत्येची आठवण होताच मला कोणी हत्यारी म्हणून पकडावयास मागे लागले आहेत असे भय वाटते. म्हणून म्हणते मला या हत्येचा मागमूस देखील नाहीसा केला पाहिजे. तर पहा पहा, माझ्या हृदयावर अशा कोण्या निष्पाप रक्ताचे डाग उडाले आहेत का! अग असे कसे वरून वरूनच माझे हृदय दिसेल तुला. माझ्या डोळ्यातून लवून बघ. म्हणजे माझे हृदय दिसेल तुला. विश्वासघातक हत्येच्या रक्ताचे डाग हृदयात पडतात म्हणून म्हणतात; त्यातही ते सांडलेले रक्त, सखे, एका अनुरक्ताचे रक्त होते!

(चाल: बोल भावेन्दा बोल)

हाय सखे गे हाय । सांडी मी जे । अनुरक्ताचे । रक्त ते एक्या ।। ध्रु. ।।<br>
मांडीवरी माझ्या । निजवी ज्या चुंबुनी । मी केसाने कापी ।<br>
कंठा त्याच्या । अनुरक्ताचे । रक्त ते एका ।। १ ।।

नलिनी : सुलोचना बाईमहाराज. हे काय म्हणता आहा तुम्ही! हत्या कोणाची? अनुरक्त कोण? वीरांगने, अशी अकस्मात् विचलित का झालीस? मला भीति वाटते. सांग ना नीट काय ते!

सुलोचना : माहीत नाही तुला अनुरक्त कोण? अग, मी ज्यावर अनुरक्त, जो माझ्यावर अनुरक्त, तो माझा वल्लभ! नलिनी, मी वल्लभाची हत्या करून आलेली आहे. तरवारीन नाही. अग, अशा विश्वासघाताला तलवारीची धार बोथट पडते. ही बघ माझ्या जिभेची धार! विश्वासाचा घात करणाऱ्या ज्या आघातास तरवारीची धार चळचळ कापते तो घात ह्या जिभेच्या धारेने केला. नलिनी, मी माझ्या जिभेने माझ्या वल्लभाचा शिरच्छेद केला, माझ्या केसाने माझ्या दयिताचा गळा कापला. (थरथर कापत मंचकावर लवंडते.)

नलिनी : हे काय अभद्र बोलता बाईमहाराज! वायूचा तर झटका आला नाही ह्यांना? काय करू बाई मी आता. महाराज, महाराज कोणी चटकन् आपल्या शिबिरात आले तर आमचे हे वेषांतर उघडकीस नाही का येणार अशा वर्तनाने?

सुलोचना : खरेच, अजून वेषांतरात आहे नाही मी? तेव्हा नाटक चालू असताच रंगभूमीवरून नटवेषातच प्रेक्षकांतील आपल्या स्नेह्यास बघताच चटकन् हाक मारून जाणाऱ्या अडाणी नटासारखेंच हे माझे विसरभोळे वर्तन हास्यास्पद होत आहे खरेच. तर आता असे कर. उतर हा माझा नाटकी वेष. तू मात्र तशीच आपल्या पुरुष वेषात आपल्या छावणीच्या देवडीवर पहारा देत बस, आणि मी आतल्या कक्षात मनाशी थोडा वेळ बोलत बसते. आपण पुरुषवेष घेऊन जेव्हा निघालो तेव्हापासून मी माझ्या अबला मनाला बंदीत टाकून त्याच्या मुखावर मोहोर ठोकिली होती आणि ती वल्लभाचा हात जेव्हा उघडील तेव्हाच उघडील असा माझा पण होता. पण आता तो पण मी आपणच होऊन अशक्य करून टाकिला. कारण नलिनी, केवळ मी मत अनुकूल दिले नाही म्हणून शत्रूस शरण जाण्याचे ठरले नाही, आणि शाक्य शरण येणार नाहीत तर क्रूर विद्युद्गर्भाने वल्लभास ठार मारण्याची आज्ञा सोडली आहे. ही रात्र विसाव्याची; उद्या शत्रूवर शेवटची चढाई. आमचा रणनिर्णय त्याचे हातात आता पडत असेल - आणि त्यासरशी त्याचे हातांतील खड्ग माझ्या वल्लभाच्या कंठावर! हाय, हाय! आता माझा वल्लभ मला कसचा भेटणार! आता माझ्या मनाच्या गोष्टी बोलायला नि ऐकायला ते कसचे येणार! माझे बुद्धिवाद ऐकावयास सगळे जग उरलेच आहे. ते बुद्धिवाद मी गेले आठ दिवस बोलतेच आहे. पण आता एकान्तात माझ्या मनाच्या गोष्टी बोलावयास माझ्या मनावाचून दुसरे कोणी उरले नाही. म्हणून मी आता काही वेळ त्याच्या तोंडावरची मुद्रा काढून टाकणार. मी आता थोडा वेळ माझी मी होणार! माझ्या नाटकाचे बाकी प्रवेश संपले. आता शेवटचा प्रवेश तेवढा उरला आहे. नाटककाराचे पाठ बोलणे बोलून दोन प्रवेशांमधील वेळ पडद्यामागे आलेले नट जसे आपले आपण होऊन स्वतःचे बोलणे बोलण्यात घालवितात तशी मी पण घालविणार. मी आता विवेकविरचित वीररसाची नुसती भाषणे पाठ म्हणणे सोडून क्षणभर माझ्या स्वतःच्या अल्लड बोलीत माझ्या मनाशी एकान्त करणार आहे. होय, एकान्त. त्या एकाचार त्या माझ्या अनन्य एका जिवलगाचा रअंत करून साधलेला हा एकान्त. चल, ह्या आतल्या कक्षात चल आणि उतर हा माझा नाटकी वेष. आणि मग पहाऱ्यावर जाऊन बैस.

(दोघी आत जातात. आतील पडदा उघडतो.)

सुलोचना : (स्त्रीवेषात आरशासमोर) हं. हं. आता मी माझे मला ओळखले. ही तीच माझी मी सुलोचना. अगदी तशीच की, जशी एक्या आठदहा दिवसांपूर्वी हातांनी कामदेवाच्या पूजेची माळ गुंफीत, तोंडाने माळेचे गीत म्हणत मनाने माझ्या वल्लभाची वाट पहात अगदी मागच्या पायी येतो म्हणून बाहेर गेलेल्या माझ्या वल्लभाची वाट पहात - माझ्या भवनांतील शयनमंदिरात, त्या अल्लड एकान्तात असताना दिसत होते! पुढे काय झाले ते जसे झालंच नाही असे समजून आता

ये, माझ्या मना ये, नि माझ्याशी बोल. तुझी विवेकबुद्धीची ती सासू पळभर निजली आहे. तेव्हा तोंवर माझ्या मना, माझ्याशी अगदी मनसोक्त बोल. घरातील दिवसांची सगळीं कर्तव्ये आटोपल्यावर सासूने संध्याकाळी घडीभर देवास जाऊन यावयास आणि विसावा घ्यावयास सांगितले तर त्या वेळेस कुलवधू मोकळ्या मनाने हसत बोलत बसतात. माझ्या ह्या जीवनाचा दिवस मावळत संध्याकाळ होत आली आहे. तर चल मना, उभ्या उभ्या देवास जाऊन येऊ चल. (वल्लभाचे चित्र काढून) ही पहा माझ्या देवाची मूर्ति! माझ्या देवा, माझ्या वल्लभा, माझ्या प्रियकरा, असे छातीशी बिलगावे जरा.

(चाल: ख्वाजा के कदम पे)

येचि आजि जाता जाता । एकदा मला घे ।

जिवलगा मला घे । ये ना । छातिशी मला घे ।। ध्रु. ।।

नसे आयुष्य वा धनी ना मृत्युही ज्याच्या ।।

प्रिया एकान्त हा ऐका एका तुझा माझा ।। जिवलगा मला घे ।।

अहाहा, माझ्या प्रियकराशी एकान्तात इतक्या दिवसांनी पुन्हा असे अगदी सहज बोलताना मला किती हलके वाटते आहे म्हणून सांगू? लवकर परत येणार होतात ना? आपल्या प्रीतिविवाहाला वर्ष झाले म्हणून त्या आपल्या रत्युत्सवाचा पहिला वाढदिवस साजरा करावयाचा होता ना? त्या मंगलासाठी मंगलास्पद कामदेवाची पूजा बांधावयाची आहे ना? मग लवकरच यायचे ना? मी आता पुनः निष्कारण रुसव्यात वेळ घालवायची चुकी करणार नाही. मी प्रेमाचा देखील अबोला धरणार नाही. इतकंच फार तर विचारीन की वल्लभा, सांगा बरे आता पुन्हा, स्त्री ही पुरुषाची शृंखला की स्फूर्ति ते? तुम्ही ज्या रणांत आततायी शत्रूचे निर्दालन केले, दयिता तुमच्या या दयितेने देखील त्या रणात तसेच त्या शत्रूचे निर्दालन केले आहे. तुमच्या हातून गळते न गळते तो ते कृपाण उचलून तुमचे कृपाण गळले असे शत्रूंस भासूही दिले नाही. मग वीरा, शोभते ना तुम्हांस ही वीरांगना! मग सांगा बरे स्त्रीपुरुषांची शृंखला की स्फूर्ति! पुरुषाची न्यूनता की पुरुषाची पूर्ति? माहीत आहे मला याचे काय उत्तर देऊन मला पुन्हा पेचात धराल ते; असच म्हणाल, 'खरे; पण तुझा गुरू कोण? तू कोणाची शिष्या?' आपलीच बरे, वल्लभा आपणच या वीरत्वाची आणि कर्तव्याकर्तव्यशास्त्राची चार सोपी सूत्रे मला शिकविलीत बरे आणि आपणच दिलेला हा धर्माधर्म विचारणेचा वर, भोळ्या सांबा, भस्मासुरासारखा शेवटी आपल्याच जिवावर उलटला. आणि मघाच्या समरसभेत आपल्या मस्तकावरच त्याचा नाशक हस्त ठेवता झाला. इंद्रियनाश म्हणजे इंद्रियजय नसून इंद्रियसुखे यथाकाम उपभोगीत असताही लोकहिताच्या साधनी व्यत्यय येताच त्या वैयक्तिक सुखांचा बळी देण्यास तत्काळ सिद्ध होणे हाच खरा इंद्रियजय होय. असा कर्मयोग जो आचरतो तो संसारी संन्याशासारखाच विदेहमुक्तीचा अधिकारी असतो ही आपल्या पित्याची, पितामह विक्रमसिंहाची, ह्या सेनापति संन्याशाची, धर्मसूत्रे आपण ब्रीद म्हणून पाळलीत मला ब्रीद म्हणून धारण करविलीत ती शिकविलीत तशी मी आचरली. त्यात काही चुकले असेल

तर त्याचे दायित्व, हे सेनापते, तुमच्या सैनिक शिस्तीत आहे. कारण त्या समरसभेत तो अघोर निर्णय देणारी मी नसून शाक्य सेनापति वल्लभांच्या अगदी निकटतम शिक्षणात आणि शिस्तीत कसलेला त्यांचा एक राष्ट्रीय सैनिक होता. पण आता मात्र मी सुलोचना आहे. माझ्या वल्लभाची ती अल्लड पोरसवदा प्रियकरीण आहे. भगवान् कामदेवाच्या पूजेसाठी मी फुले गुंफीत होते आपण निघालात तेव्हा! बाई, बाई किती तरी सुकली! त्यांचा काय अपराध! ह्या मर्त्य जगात फुले सुकणारच, पाकळ्या गळणारच, सुवास जाणारच. पण म्हणून मी काही जगाला दोष देत सुटत नाही, त्याचा सारखा तिटकाराच करीत नाही. कारण फुले फुलतातही जगातच, पाकळ्या उमलतातही जगातच, सुवास दरवळतातही जगातच!

(चाल - मौं मन को फसिया)

सुकतातचि जगि या । जरी की । फुले गळत पाकळी पाकळी ।
उमलति ना त्याही कलिका । ज्या ।। ध्रु. ।।
परंतु सुंदर कळ्या पाकळ्या फुलती ही जगि या ।
विसर ना हे वैतागीं । तुझिया ।। १ ।।

चुकले इतकेच की, फुले उमलली आहेत तोच चटकन् त्याचे काय कोडकौतुक पुरवावयाचे, काय साजसजावट करावयाची, काय पूजापुष्पांजलि वहावयाच्या त्या वाहून घ्यायच्या त्या मी घेतल्या नाहीत. त्या दिवशी ते जाता जाताच प्रेमाच्या अबोल्यात वेळ न दवडता ही फुलमाळ ताजी होती तोच चटकन् गुंफून त्यांच्या गळ्यात मी घातली नाही! आणि म्हंटले नाही घ्यायचे न गडे मला एकदा! पण अजूनही किचित् संधि आहे ही माझ्या भक्तीची माळ माझ्या देवाच्या गळ्यात घालण्याची! कारण जे म्हणतात की स्वर्ग आहे तेच म्हणतात की आततायी नाशनार्थ केलेल्या धर्मयुद्धात हत झालेले ते त्या स्वर्गास जातात. तेव्हा ते जर शक्य असेल तर माझा वल्लभ हत होऊन स्वर्गी जाऊन देव झालाही असेल. युद्धाच्या रात्री मीही धारातीर्थी अभिमुखी हत होणार आणि प्रियाच्या पाउली पाऊल देत स्वर्गास जाणार. तेव्हा ही माळ सुकली असली तरीही मी अशी बरोबरच ठेवावी. कारण जर आमच्या बरोबरचे पार्थिव देह स्वर्गी देवगति पावतात तर आमच्याबरोबर असलेली पार्थिव फुलेही स्वर्गी देवफुलांची गति का पावू नयेत? ही एवढी उरलेली रात्र गेली की उद्या ह्याच वेळी रात्री स्वर्गाच्या दारात पाऊल टाकताच माझा वल्लभ देव, मी देवांगना नि ही देवफुलांची माला, पारिजातकांची माला होणार! माझी अपूर्ण राहिलेली कामदेवाची पूजा पूर्ण होणार. माझा वल्लभ दिसताच ही माला त्याच्या अशी गळ्यात घालीन. म्हणेन घ्यायचे न गडे मला एकदा; ते मला असे त्यांचे बाहु पसरून त्या सुविशाल वक्षी घेतील. मी माझे हात त्या बलिष्ठ स्कंधावर असे टेकून, ह्या हृदयावर अशी डोळे मिटून प्रीतिसमाधीत अशी तल्लीन होईन. (इतक्यात तिच्या पसरलेल्या बाहूत वल्लभ येऊन उभा राहतो.)

वल्लभ : सुलोचने, सखे!

सुलोचना : कोण वल्लभ? आश्चर्य, भक्ताच्या ध्यानाची उत्कटता झाली म्हणजे त्याच्या इष्ट देवाचा साक्षात्कार होतो म्हणतात ते काही खोटे नव्हे तर! मी स्वर्गातच आहे की स्वप्नात! देवा, तू माझ्या मनाचा केवळ भास तर नाहीस? असेनास का! ज्याला मी सत्य म्हंटले तो भासासारखा नाहीसा झाला, मग ज्याला मी भास समजते तो जर असा संस्पर्श प्रत्यक्ष मूर्तिमान् टिकून राहील तर तो भासच सत्य आहे, भास तोच सत्य, सत्य तेच भास. मग वल्लभ, बोलाना आपण भास आहात की साक्षात्कार की साक्षातच? आपण भूलोकी आहोत की, स्वर्गी की स्वप्नीं?

वल्लभ : प्रिये, मी साक्षात् वल्लभच आहे. सरतेपदी ह्या तुझ्या माझ्या मायामय जगात जितका पूर्वी वास्तव वाटते होतो तितका तरी वास्तव आहेच आहे. मला देखील हा माझा पुनर्जन्म आहे की जन्मच आहे ह्याची शंका वाटते! पण ते जाऊ दे सगळे, जन्म वा पुनर्जन्म, स्वर्ग वा स्वप्न, आभास वा वास्तव या एका विपलाच्या आश्चर्यकारक आवर्तात आपली ही अद्भुत भेट झाली आहे खरी. तर ये आणि ह्या आलिंगनाच्या सुखसागरात एकदम उडी टाकून दोघेही निमज्जून जाऊ ये. (भेटतात.) सुलोचने! -

सुलोचना : वल्लभा!

वल्लभ : माझा शिरच्छेद झाला तरी चिंता नाही. पण दुष्ट शत्रूस शरण जाणे बरे नाही असे मत तू दिलेस ते खरे ना?

सुलोचना : होय प्रिया -

वल्लभ : मग त्याचा मला फार राग आला आहे.

सुलोचना : नाही प्रिया, ते शक्यच नाही, बरे, आता परत येतो असे सांगून आपण त्या दिवशी राजसभेस गेलात आणि राष्ट्रीय रणाचे रणशृंग फुंकले जाताच मला तशीच टाकून निरोप देखील देण्यास न येता नित्याचेच अंतरलात हे खरे ना?

वल्लभ : होय प्रिये, वीरकर्तव्य मागे पाऊल टाकू देईच ना.

सुलोचना : तर मग त्याचा मला फार राग आला आहे.

वल्लभ : नाही प्रिये, ते शक्यच नाही. तू वीरांगना आहेस.

सुलोचना : तसेच मी शाक्यांनी शरण जाऊ नये म्हणून जे मत दिले त्याचा राग आपणांला येणेही शक्यच नाही. कारण वल्लभा, आपण वीरवर आहात! पण सख्या, माझे मन अजून देखील गोंधळले आहे की, आपण किंवा मी, कोणी तरी किंवा दोघेही हे स्वप्नच पहात आहोत. तर सांगा की, कोणत्या योगायोगाने माझी आपली ही भेट होत आहे? आपली सुटका कशी झाली, मी इथे आहे हे आपण कसे ओळखलेत? चटकन् सांगायचे बरे का. कारण ते सविस्तर ऐकण्यापेक्षा अनंत पुण्याचे फळच अशा या पळत्या पळी आपल्या आलिंगनात स्वतःस विसरून आपल्या वक्षावर असे निमूटपणे निजणे फार आवडत आहे, तरीही ते थोडेसे तरी ऐकावेसे वाटते.

वल्लभ : मी आहत होऊन शत्रूच्या हाती पडल्यानंतर गेल्या चार पांच दिवसांत तुमच्या पराक्रमाने शाक्यांनी विद्युद्गर्भाच्या सैन्याचा जो फडशा पाडला त्यायोगे कोसल सैन्य पुष्कळच अव्यवस्थित

आणि घाबरे झाले. माझ्या बंदीवरील दोन्ही पहारेकरी घायाळ झालेले सैनिकच होते. ते गुंगून पडत. अशा एका रात्री शेजारच्या गावाहून शत्रुसैन्यात बळाने ज्यास आणणे भाग पडले होते असा एक शाक्य शेतकरी दैवयोगाने तिथेच उभा होता, त्याने मला ओळखले आणि धाडसाची पराकाष्ठा करून त्या त्या पहारेकऱ्यांच्या गुंगीत आपल्या किल्ल्या लावून कुलूप उघडून मला बाहेर काढले. त्याच्याच गड्याच्या वेषात मी विद्युद्गर्भाच्या सैन्यातून निसटलो. आपले सैन्यात हा असा पोचलो तो सेनापति पिताजी विक्रमसिंहाकडून समरसभेचा निर्णय कळला. त्यात ज्या तरुण सेनानीने शरणागतीचा धिक्कार करून शाक्य राष्ट्राच्या स्मृतीस तो कलंक तरी लागू दिला नाही त्या शाक्यांच्या मूर्तिमान् अभिमानास आणि पराक्रमास पहावे म्हणून ह्या तुझ्या डेऱ्यावर आलो. तो बाहेर तुझा उभा असलेला पहारेकरी मला हटकण्याचे ठिकाणी गोंधळून जाऊन माझ्या पायावर एकदम डोके ठेवता झाला, त्याचे मस्तक वर उचलून पहातो तो ती नलिनी! दोन चार वाक्यांत तिने काय ते मला सांगितले आणि मला कळले की शाक्यांच्या पराक्रमाची मूर्ति म्हणजे ही माझी अल्लड, रुसकी, प्रेमळ, पोरसवदा सुलोचना! आता उद्यांच्या शेवटच्या रणकंदनात आपण सेनापति नाही होणार. ह्या माझ्या चिमुकल्या सेनापतीच्या पथकांतील आम्ही केवळ एक सैनिक!

सुलोचना : आता उद्याचे उद्या. कालचे काल. सख्या त्या अंतिम उद्याच्या नि त्या कठोर कैचीत हा जो आजचा लवलेष सापडला आहे तेवढाच मला सध्या स्मरू द्या, हा माझा वल्लभ नि त्याच्या आलिंगनात अशी विरून, वितळून विसरून चाललेली ही मी त्याची सुलोचना इतकेच मला स्मरत आहे. सख्या, मला कसेसेच होत आहे. तुमचे ते त्या दिवशीचे जसे जाणे, तसेच हे येणे. दोन्हीही अपघातिक, अकस्मात्, दोन्हीही असह्य; वल्लभा, मला जरा अंकावर घ्या. कामदेवाची पूजेची ही माझी सुकलेली माळ अशी गळ्यांत रूळू द्या. माझ्या नयनांतील हे निवत आलेले नीरांजन आपल्यावरुन क्षणभर ओवाळू द्या. नाथा, मला कसलीशी गाढ झोप लागते आहे. माझ्या प्रेमाच्या शेवटच्या संगमाच्या ह्या शेवटच्या रात्रीच्या अशा ह्या गोड गुंगीवरच भगवान् कामदेवा, माझ्या जीवनाचाही शेवटचा पडदा पडू द्यावा! पण थांबा; केवळ उद्या तेवढी मला रणापुरती जागी करावी अं. अजून रणशय्येच्या ह्या रतिशय्येप्रमाणेच आपल्याशी सहशय्या करावयाची माझी उरलेली हौस तेवढी पुरवावयाची आहे. तर उठवावे अं मला तेवढ्यापुरते. नाही तर त्या उद्याच्या रणशय्येच्या चटक्यान ही माझी रतिशय्येवरील जीवनाची अंतिम निबिड निद्राही मधून मधून दचकेल! नाथा, नाथा, कुठे आहात!

वल्लभ : काय? सुलोचने, सुलोचने, हा मी इथेच आहे. काय, काय?

सुलोचना : मला कायसे असह्य हवेस होत आहे. ही गोड गुंगी! का मोहक मूर्च्छना!! की मधुर मरण!!!

वल्लभ : म्हणजे हे काय! माझी सखी बोलता बोलता मूर्च्छित झाली! हिची नाडी, हिच्या जीवनाचे हे सूत्र छे-छे, भाबड्या प्रेमा. वेड्या मना ही मूर्च्छाही नव्हे. ह्या माझ्या कमनीय कांतेच्या जीवनाचा हा धागा मृत्यूचा हात सारखा हिसडून गुंडाळीत आहे. मरणा, ह्या तिच्या

नाडीच्या ह्या जीवनाच्या धाग्याने तू तिला खेचून नेऊ पहात आहेस; पण मी तुला तशी नाही नेऊ देणार. तुझे पाश माझ्या गळ्यात माझ्या शत्रूच्या हाती सापडलो तेव्हा पडले; पण त्यातून मी निसटलो म्हणून का तू चवताळून माझा पाठलाग करीत येथे आला आहेस? तसे असेल तर तुझा नेम चुकला आहे. माझा गळा हा माझ्या प्रियेचा; एका अबलेचा; गळा आहे. एखाद्या अडाणी धनुर्धराप्रमाणे लक्ष चुकलेले ते तुझे पाश तिच्या गळ्यांतून काढून ह्या माझ्या गळ्यांत टाक! हाय हाय, ही चालली! ह्या माझ्या कृपण आलिंगनातून माझी सखी मरणाच्या पाशात सारखी सारखी हिसडली जात आहे! आता काय करू. हिचा श्वासर हिचा प्राण, माझी रत्नाची ठेव रनाही! ह्या हिच्या लावण्यनिधान देहातून मी बाहेर जाऊ देणार नाही. ह्या सुंदर सोन्याच्या पेटीच्या मोहक मुखावर मी एखाद्या कट्टर कंजुषासारखा हे चुंबनाचे कडीकुलूप घालणार नि तिच्या हृदयाची पुडातील ती तिच्या प्राणाची अमोल रत्नांची ठेव मी बाहेर पडू देणार नाही! सुलोचने, लाडके-आता काय करू! नलिनी, नलिनी!

नलिनी : (प्रवेशून) स्वामिन् हे काय? आपण अकस्मात् शोकविव्हळ का?

वल्लभ : माझी सुलोचना मूर्च्छेच्या निसरत्या उतरणीवरून अकस्मात् मृत्युचे डोहात घसरली.

नलिनी : महाराज हे काय अभद्र बोलता! हे झाले तरी कसे?

वल्लभ : अग, कसे म्हणजे काय? मघा समरसभेत तिने माझ्या वधास संमति दिली होती ना? त्याचा सूड म्हणून म्या या चांडाळाने, ह्या तिच्या वल्लभाने ह्या त्याच्या सुंदर सखीच्या हृदयात सुखाची सुरी भोसकून तिचा वध केला! नाही समजले? नलिनी, मागे मी तिला एकटी सोडून अकस्मात् रणांगणाच्या मृत्युमुखात गेलो ना तेव्हा त्या अपघातिक वियोगाच्या असह्य दुःखाने जिला मी घायाळ केली त्याच ह्या माझ्या सखीला मी त्या मृत्यु मुखातून असा अकस्मात् परत येताच ह्या आकस्मिक संगमाच्या असह्य सुखाने ठार मारून टाकिली. नलिनी, शोक माझ्या हृदयात मावत नाही. ह्या सेनाशिबिराची शिस्त मोडून माझा मूक शोक हंबरडा फोडू पहात आहे!

नलिनी : (ऐकून) हे काय? कुठे तरी मोठा उंच गलका होत आहे.

वल्लभ : अग, गलका नाही- तो माझ्या ह्या मूक शोकाचा प्रतिध्वनी तिकडे दूर छावणीच्या शिस्तीबाहेर जाऊन मनसोक्त थैमानत आहे!

(चाल - कोन खेले तोसे)

मूक शोक भर माझा । गे हा हाय । हंबरडा फोडी ।। ध्रु. ।।

वा गहिवरल्या वनदेवींचा। सहदुःख भर साचा। गे हा हाय हंबरडा फोडी ।।१ ।।

(रणशृंग वाजते. 'शत्रूचा छापा, उठा!' असे म्हणत शाक्य सैनिक येतात.)

शाक्य सैनिक : छापा! छापा! सेनापते, शत्रूचा शूर सेनापति चंड ह्याने आमचे छावणीवर तिकडे उत्तरेकडून भयंकर छापा घातला आहे! उद्या आम्ही शत्रूवर शेवटची चाल करणार होतो तो त्या आधीच शत्रूने अकस्मात् घाला घातल्यामुळे आता ह्या रात्री हीच सोक्षमोक्षाची संधि समजून

सर्वाधिकारी विक्रम सिहांनी शेवटच्या रणास तोंड देखील दिले. सर्वांनी तिकडेच मारीत हाणीत निघावे ही त्यांची आज्ञा-

वल्लभ : शिरसावंद्य! हे उचलले कृपाण! ऊठ सुलोचने, जातिशत्रु चालून आला - शेवटचे रण ते हेच! ऊठ! लोककल्याणार्थ वैयक्तिक जीवनसुखाप्रमाणे वैयक्तिक मरणसुख देखील क्षणभर बाजूस ठेविले पाहिजे. (पुन्हा गलका. 'धावा उपसा शस्त्रे - धावा!') हो धावतोच. नलिनी, चाललो मी! ह्या रणात आहत होऊन तिच्या शेजारीच मरावयास परत येईतो माझ्या प्रियेच्या मृत देहाचे रक्षण कर. जर परत न आलो तर ह्या शिबिरासह तो अग्निनारायणास अर्पण कर! आणि आता, जाता, जाता- सखे हा तुझ्या कामुकाचा शेवटचा मुका निरोप!

(चाल - उठो पिया जागो)

सखा तुझा जातो । निरोपा सखि देई ।। ध्रु.।।

जाण्यासी ज्या परत न येणे ।

त्या जाण्याच्या । निरोपा सखि देई ।। १।।

आसूंत पुसल्या । उमटे न कंठी ।

मुका कामुक हा । निरोपा । सखि देई ।। २ ।।

(चुंबून) चला, फुंका ते रणशृंग! (सैनिकांसह जातो.)

सुलोचना : (दचकून जागृत होत) काय! ही रणशृंगे (हाताने चाचपीत) वल्लभा- उठवा मला - हात द्या - (दचकून उठून) काय वल्लभ गेले? का आलेच नव्हते? का ते सगळेच स्वप्न होते?

नलिनी : हे काय, पुनर्जन्म? सखे ये, कडकडून मिठी मारू दे प्रथम! देवि गोंधळू नकोस. वल्लभ खरेच आले होते. पण त्या अकस्मात् सुखाच्या अतिशयास न साहून मूर्च्छा येऊन तू इतकी निश्चेतन पडलीस की, आम्हांला नित्याची अंतरलीस म्हणून आम्ही विलापू लागलो तोच तिकडे उत्तरेकडे आपल्या सैन्यावर शत्रूंचा बिकट घाला पडला! तिकडे मोठी रणधुमाळी माजलेली आहे. त्यासरशी तीतच वल्लभांनी उडी घेतली.

सुलोचना : आणि मला अशीच टाकून दिली? मला रणात जाताना उठवा म्हणून मी सांगितले असता फसविले ना मला?

नलिनी : मरणातूनही माणसे रणासाठी उठतात हे काय माहीत त्यांना?

सुलोचना : माहीत होते! मी मरणाशी त्याच्या मूर्च्छेच्या दारात पाऊल टाकताना असा करारच केला होता की मला ह्या शेवटच्या रणापुरती तेवढी मरणाने एक मधली सुटी द्यावी नि वल्लभाशी रणशय्येवरही सहशय्या करण्याची माझी हौस फिटू द्यावी!

नलिनी : अग, त्या रणधुमाळीची ही तुंबळ लाट तुझ्या शिबिरात घुसली की काय?

सुलोचना : बघतेस काय, उपसू हे खड्ग आणि घालू ये उडी तीत!

नलिनी : पण तू मूर्च्छेने थकलेली -

सुलोचना : अजून तुझ्या ध्यानात आले नाही? मूर्च्छेने थकलेली नव्हे. मी मरणाने मेलेली आहे. पण शूर वीरांची मस्तके छाटल्यावरही त्यांची कबंधे लढतात हे तू ऐकले नाहीस का? नलिनी, तसे हे माझे कबंध लढणार, शाक्यांचा सूड उगवीत, शत्रूंची शिरे उडवीत, हाणमार करीत वल्लभ असतील तिकडे जाणार.

नलिनी : मग हा स्त्रीवेष तरी बदल. पुन्हा पूर्वीच्या पुरुष वेषात -

सुलोचना : अग, त्या सोंगाची बतावणी संपली. ते माझे सोंग लढत होते; आता माझी मी लढणार! स्त्रीवेषात भवानी लढली. स्त्रीवेषातच शूर स्त्रीस रणात दसपट अवसान चढते. मी स्त्रीवेषात लढणार!

(चाल - बोलो बोलो बोलो-)

मुक्त- खड्ग- कर ऐशी ऐशी। स्त्रीवेषातचि लढे भवानी ।
महिषासुरमर्दिनी रणी जैशी ।। ध्रु.।।
वीरसुता मी नीरवल्लभा ।। दुष्ट दैत्य दल वधिनचि तैशी ।। १ ।।

(तोच 'कोसलचा जय' लुटा, हाणा' करीत कोसल सैनिक येतात.)

नलिनी : सावध, सखे! हे शत्रु-

सर्व सैनिक : हाणा, मारा!

एक सैनिक : पण ही स्त्री आहे.

दुसरा सैनिक : पण ती शाक्य आहे.

सर्व सैनिक : म्हणून मारा!

सुलोचना : आणि ती लढवय्यी आहे म्हणून मारा. (लढाई जुंपते.)

सर्व सैनिक : कोसला जय! (गर्जत लढतात.)

सुलोचना आणि नलिनी : शाक्यांचा सूड! (गर्जत लढतात.)

(सैनिक काही ठार होतात, काही हटतात, तसेच झगडत सर्व बाहेर जातात.)

प्रवेश ६ वा

(एकीकडून सेनापति चंड आणि दुसरीकडून त्याचे अनुचर येतात.)

चंड : काय आपल्या सैन्यातील उरले सुरले ते सारे इतकेच सैनिक?

अनुचर : होय; कोसल सेनापते चंड महाशय, आपल्या आज्ञेप्रमाणे ह्या भयंकर रात्री युद्धातून वाचले असे जे हे कोसल सैनिक रणांगणात विखुरलेले सापडले ते गुप्तपणे एकत्र करून आणले आहेत. शत्रुपक्षाचीही पूर्णपणे नासाडी झाली. पूर्वीचा शाक्य सेनानी सुलोचन ही वास्तविकतः वल्लभांची पत्नी सुलोचना होती. ते आपणांस कळलेच आहे. ती स्त्री

चंड : स्त्री? ह्या रात्रीच्या आपण घातलेल्या छाप्यात सर्वच शाक्यांनी लढाईची पराकाष्ठा केली खरी; पण त्या सर्वांत जर खरे पौरुष कुणी गाजविले असेल तर ते त्या स्त्रीने! ती पुरुषवेषात काळासारखी लढली तर स्त्री होताच एखाद्या कृत्येसारखी! जेव्हा काळोखातही ओळखून मी वल्लभाला प्राणघातक वार करून पाडला तेव्हा तिलाही घायाळ झालेली पण बेछूट लढत असलेली दूरच्या प्रकाशात पाहिली होती. पुढे

अनुचर : ती बहुधा तिथेच गतप्राण होऊन पडली. शाक्यांच्या अवघ्या सैन्यात एक विक्रमसिंह तेवढा स्वतः घायाळ असताही काही अनुयायांसह अजून रणांगणात आपला पाठलाग करीत रक्तास चटावलेल्या वाघासारखा रणचुडी पेटवून हिंडताना दिसला. बाकी शाक्यांचे सगळे सैन्य कापले गेले; सेनापते, चंड! आणि आपलेही!

चंड : शाक्य आज लढलेच तसे अनपेक्षित शौर्याने! जर ते युद्धाच्या आरंभापासून तसे लढते तर आमची त्यांच्यावर स्वारी करण्याची छातीच झाली नसती. तरी देखील महाराजांनी दिलेली कामगिरी मी पूर्ण केली. शाक्यांचे शेवटचे सैन्य ठार केले. ह्या विजयापेक्षाही विद्युद्गर्भ महाराजांचे चरणी वाहण्यासारखा आणखी एक अमूल्य पुरस्कार बरोबर घेऊन मग तिकडे जावे असे मला वाटते. हे पहा, शाक्यांच्या नांवाचा मागमूसही जर पुसून टाकणे असेल तर तो बुद्ध नाहीसा झाला पाहिजे. दचकू नको तो आजही इतर जातीतील हजारो जणांच्या मनांत कोसलांनी शाक्यांचा घात केला म्हणून आपल्याविषयी द्वेषबुद्धि भरवू शकेल; भरवीतही असेल. ह्यास्तव मी त्यासही या छाप्यातच ठार मारणार होतो, माझा तो हेतु साधण्याची धडपड मला अजूनही सोडवत नाही.

अनुचर : पण आपला जीव घेऊन येथून निसटणेच दुर्घट झाले आहे.

चंड : शाक्य जर लढणे सोडतील तर बुद्ध भगवानांच्या शब्दाबाहेर आम्ही जाणार नाही आणि शाक्यांशी संधि करू, तेव्हा बुद्धांनी शाक्यांस निरर्थक हिंसेपासून परावृत्त करावयास यावे म्हणून आम्ही त्यास आमिषमय आमंत्रण पूर्वीच दिले होते आणि बुद्धाने त्यायोगे हुरळत जाऊन ह्याच रात्री इथे येण्याचे मान्यही केलेले होते. अजून पहाट झाली नाही तो अजून टेकडीकडून ह्या वाटेने त्या पलीकडच्या विहारास येण्याचा संभव आहे. तोवर आपण बाजूस दबा धरून रहावे. नाही आला तर उजाडता पुढे निसटून जावे. पण जर का तो आला तर अहाहा! त्याचे शिर छाटून ह्या शाक्य

विजयावर मी कळस चढवीन. मग त्या पायी आम्ही उरलेले वीरही ठार झालो तरी त्याची चिंता नाही. त्याचा शस्त्रबळाच्या उपेक्षेचा दुधखुळा आणि दुबळा उपदेश शाक्यांस दुधखुळे बनवितो आम्हांस उपयोगी पडला. पण आता स्वतः कोसललाही दुधखुळे बनवितो त्यास जिवंत न ठेवणे हेच इष्ट. चला! ह्या विखुरलेल्या प्रेतांच्या आणि ढिगांच्या पलीकडे त्या वाटेशी दबून बसू चला (जातात.)

सुलोचना : (रक्तबंबाळ मुक्तकेश प्रवेशून) ह्या अंधेरात जितके दिसते त्यात ह्या रणभूमीवरील प्रेत न् प्रेत शोधून पाहिले पण माझा वल्लभ घायाळ होऊन कुठे पडला तो अजून दिसत नाही. माझी नलिनी लढाईत कामास आली तेव्हा इकडूनच कुठून तरी त्या वीरसिंहाची त्या माझ्या वल्लभाची घनगर्जना उठत होती. माझ्या प्राणा! शाक्यांचा सूड शक्य तो उगवण्याचे तुझे करावयाचे काम संपले. आता मी तुला जाऊ द्यावे हे खरे. पण प्राणा, एक क्षणभर, अगदी क्षणभर तरी, धीर धर! माझ्या रणक्षेत्री पडलेल्या वल्लभाच्या पायाचा अंगारा तेवढा एकदा मी लावला की हे अंग टाकून दिलेच आणि प्राणा, तुला स्वैर सोडलेच म्हणून समज. (प्रेते बघत) वल्लभा, वल्लभा! माहिती विचारावयास मनुष्य म्हणून उरले नाही! देवांनो, देवतांनो, भुतांनो, प्रेतांनो, वनदेवींनो, रणदेवीनो, जे कोणी हे माझे मनाचे मानवी प्रश्न ऐकत असाल ते सांगा! शाक्यांचा सेनापति वीरसिंह वल्लभ ह्यांचा घायाळ देह कुठे पडला आहे ते! वल्लभा, माझ्याबरोबर रणशय्येवर सहशय्या करावयाची होती ना! मग एकटेच कुठे आहात; मी सोबतीस आले आहे, थांबावे जरा वल्लभा! वल्लभा

वल्लभ : (रणांगणांवरून किंचित उठत) काय ही सुलोचनेची हांक! ती मला सोडून मृत्यूच्या परतीरास पोचली होती ना! मग मृत्युच्या परतीरावरील हाक मला स्पष्ट ऐकू यावी इतका मी मृत्युच्या जवळ आलो तर! मूर्च्छेची नाव मला घेऊन वैतरणीवरून किती जलदीने चालली आहे!

सुलोचना : वल्लभा, आहात का इथे कुठे! वल्लभा!

वल्लभ : ओ प्रिये सुलोचने! तूंच का ही खरीच?

सुलोचना : (तिकडे धावत जाऊन) होय सख्या, मीच ती नाथ! तुमच्या पाठीस हात धुवून लागलेली मी ती तुमची सुलोचना! आपण आपल्या अंकावरून मेलेल्या मला खाली ठेवून रणाकडे एकटेच निघताना मी इतकी दचकले की मरणातून देखील जागी झाले आणि प्रतिज्ञेप्रमाणे (आपल्या) मागोमाग शत्रूस मारीत, हाणीत पुन्हा आपल्या पायाशी आल्ये. रतिशेजेच्या सवंगड्या, ह्या रणशय्येवरही जागा द्यावी न जरा मला! झाले हा माझा शेवटचा हट्ट -

(चाल- अबरित भर आयी)

अंगना रतिरंगी । शेजारी रतिशेजेची । रण शेजेसहि घेई रणरंगी ।। ध्रु.।।

जाग जीतुनी येणे नाही । गाढ झोप ती येते पाही ।

सरक जरा मज निजु दे संगी ।। १ ।।

बघावे न मला; घ्यावे न मला एकदा शेवटचे!

वल्लभ : प्राणांनो, माझ्या इंद्रियांची सरती वात आणखी एकदाच तेवढी सारा. तिच्या चमकेत माझ्या प्रियेला पाहू द्या, भावू द्या, भासू द्या!

सुलोचना : अहाहा, प्रिया त्या कामाच्या रतिशेजेप्रमाणे नि कर्तव्याची रणशेज ही किती मऊ आणि मोहक लागते आहे!

वल्लभ : म्हणूनच ह्या धर्मरणशेजेअतकीच ती काम्य रतिशेजही शुभ आणि पुण्य होती!

सुलोचना : अशा मरणानेच आपले जीवन सफल झाले. आपले कथानक सुखान्त झाले.

वल्लभ : कोणची घटना सुखान्त वा दुःखांत हे आपण सुख कशात मानतो त्यावर अवलंबून आहे. लोककल्याणार्थ मरेतो लढणे हीच आपली कालची इच्छा ती पुरी झाली म्हणून मरणच सुखान्त! आं! सुलोचने जवळ आहेस ना! माझे प्राण - ही शेवटची हाक सुलोचने!

सुलोचने : आणि ही शेवटची ओ! ओ वल्लभा! (त्याच्या वक्षावर डोके ठेवून पडते तोच हिलाल घेऊन विक्रमसिंह आणि सैनिक प्रवेशतात.)

विक्रम : इथूनच कुठूनसा शब्द आला. हं, इकडे या पाहू! अहो, हाच तो माझा वीरपुत्र, शाक्यांचा वीर सेनानी वल्लभ आणि हाय हाय! नव्हे धन्य धन्य! हीच ती माझी सून, वल्लभाची वल्लभा, शाक्यांची रणदेवता सुलोचना! वा वा मुली, ह्या रात्रीच्या रणघालीत मला जेव्हा समजले की ह्या शाक्य सेनेतील तो तरुण वीर सुलोचन म्हणजेच माझी सून सुलोचना तेव्हा तुला दूर कोसळत्या विजेसारखी झुंजताना पाहून मला जे सानंद आश्चर्य वाटले त्याहून द्विगुणित आनंद आणि आश्चर्य तुला इथे अशी एखाद्या जादूने धरून ठेवलेल्या विजेसारखी मरणशेजेवरही आपल्या जिवलगाला आलिंगीत गतप्राण निजताना पाहून मला वाटते आहे! अहो, ह्या वीरात्म्या प्रणयी प्रणयिनीचे हे नैष्ठिक कामचर्य संन्याशाच्या नैष्ठिक ब्रह्मचर्याहून पवित्रतेत लेशमात्र उणे नाही, परोपकारितेत तर लवलेश तरी अधिकच असेल! शाक्यांत देवी यशोधरा संन्यस्त अग्रश्राविका महाभिक्षुणी म्हणवीत आहे ते योग्यच आहे. पण ह्या तरुण कन्यकेचा, सुलोचनेचा, ह्या कामदेवाच्या पूजिकेचा त्याग, इंद्रियनिग्रह, कर्तव्यतत्परता त्या महान् देवी यशोधरेइतकीच उत्कट असून हुतात्मता केवळ अलौकिक आहे! कामदेवाच्या पूजकांनो, तुमच्या ह्या अशा शुभकामी संगमलोलुप अनुरक्तीहून अधिक निष्काम, विरक्त नि निःसंग असे काय असू शकणार आहे! माझ्या शूर, सुशील, सुंदर सुने, बाळे सुलोचने, ह्या तुझ्या वीरवर वल्लभाला मरणमंचकावर दिलेले हे तुझे शेवटचे आलिंगन, हा तुम्हा दोघांचा काम देवाच्या पूजेचा शेवटचा काम्य संस्कार, एखाद्या देवपूजेच्या धर्मसंस्कारासारखाच मंगल आहे; पवित्र आहे; यच्चावत् तरुण कन्यकांना नि कुमारांना कल्याणप्रद आहे.

चंड : (आपल्या सैनिकांसह पुढे डोकावत दबकत येऊन) नाईक, तुम्ही म्हणालात तितकी माणसे ह्या विक्रमाजवळ मुळीच नाहीत. आपल्याइतकीच आहेत. त्यात हा घायाळ, तेव्हा चला बघता काय? बुद्धाच्या आधी ह्या तोंडात चालून घुसलेल्या मृगयेचा कंठ झेपेसारखा दातांनी कडाकड

फोडा. (कोसलेश्वर महाराज की जय असे गर्जत ते तुटून पडतात.) व्रतभ्रष्टा विक्रमा, मी तुलाच शोधीत होतो. घे घे! (वार करतो.)

विक्रम : दुष्टा चंडा, मीही तुलाच शोधीत होतो. घे घे! (वार करतो)

बुद्ध शिष्य : (बुद्धासह प्रवेशून) हा! हा! तथागत भगवान् बुद्ध आपणां उभयतांसही शान्त व्हा म्हणून उपदेशीत आहेत. कारण ते शांतता स्थापण्यासाठीच आलेले आहेत.

चंड : हट! सिंहाच्या तोंडाचे हरिण हिसकावतोस? (विक्रमावर धावतो.)

बुद्ध : (विक्रमास सावरून) विक्रमा, सेनापति चंड रणोन्मत झाले आहेत. क्रोध हा खवळलेल्या सापासारखा कोणासही अनावर होतो. पण तुम्ही सुज्ञ आहात. तुम्हांस आमचे धर्मसूत्र माहीतच आहे की 'अक्रोधेन जियेत् क्रोधं । असाधुं साधुना जियेत् ।'

चंड : काय नीचा बुद्धा, असाधु म्हणतोस? कोसल सेनापतीस असाधु म्हणतोस? तुझी जीभच छाटून टाकतो घे. ( बुद्धावर चालून जातो.)

विक्रम : (चंडास वार करून घायाळ करतो आणि खाली पाडून त्याच्या छातीत पाय रोवून) भगवान्, तुमच्या स्वतःच्या अक्रोधाने तरी याचा क्रोध शांत झाला का? का तो उलट अधिकच पिसाळला? जर हा साधुपरित्राण करणारा खड्ग मध्ये पडला नसता तर आता सुष्ट बुद्धाचा वध दुष्ट चंडाने केला होता.

बुद्ध : पण काही झाले तरी तुम्हांस अशी हत्या शोभत नाही; तुम्ही संन्यासी आहात!

विक्रम : आणि म्हणूनच ह्या असुधारणीय लोककंटक दुष्टाचा शिरच्छेद करणारा पहिला आणि अत्यंत प्राणघातक वार ह्या माझ्या संन्यस्त खड्गानेच केला पाहिजे! केला; ह्या चांडाळास शेवटी स्वतः ठार केला. रणातील घावांनी विकल झालेला हा माझा देह आता अर्ध घडीत पडणारच. पण तो आता अधिकच कृतार्थ होऊन पडेल! वा! ह्या ह्याच्या उसळत्या रक्ताच्या चिळकांड्यांनी माझा संन्यासी वेष आणि हा माझा संन्यस्त खड्ग

बुद्ध : कधीही न धुतल्या जाणाऱ्या पापी काळिम्याने कलंकित झाला आहे.

विक्रम : भगवान्, जरा प्रत्यक्षाच्या प्रकाशात येऊन नीट पहा तर खरे हा लालभडक रंग आहे, काळा नव्हे हे डोळे असणारा कोणीही सांगू शकेल. त्या दुष्टाच्या लाल रक्तात रंगल्याने ह्या संन्याशी बाण्याचा मूळचा रोगट, फिकट पिवळेपणा जाऊन तो उगवत्या सूर्यासारखा उठावदार आरक्त आणि तेजस्वी दिसत आहे! चाळीस वर्षांच्या निःशस्त्र संन्यासात जितका परोपकार नि पुण्य मी जोडू शकलो नाही तितके ह्या एका क्षणात असख्य निरपराध जीवांना जीवदान देणारे हे संन्याशाचे शस्त्र चालवून मी जोडले आहे. लोककल्याणार्थ तत्परता हे संन्याशाचे ऐहिक कर्तव्य असले तर ते मी कधीही केले नव्हते इतक्या उत्कटतेने आज केले आहे. म्हणून आजच मी खरा संन्यासी आणि भिक्षु शोभत आहे.

बुद्ध : हे महामना विक्रमा, ऐहिक लाभालाभाच्या दृष्टीने तुझा कोटिक्रम जरी अखंडनीय भासला तरी पारलौकिक दृष्ट्या तू जे संन्यासधर्मानुरूप अहिंसेचे महाव्रत घेतलेस त्यापासून तू आजच्या

हिंसेने च्युत झाला आहेस. त्यायोगें तुझ्यासारखा वितृष्ण, परम ज्ञानी आणि त्यागी भिक्षुप्रवर अगदी निर्वाणनिकट असूनही आज निर्वाणच्युत झाला.

विक्रम : ह्या चंडाच्या अत्याचारापासून ह्यापुढे होणाऱ्या असख्य निरपराध स्त्रीपुरुषांच्या हिंसेस टाळण्यासाठी मी ह्या दुष्टास मारले ह्या दोषास्तव मला निर्वाणपद मिळत नसेल तर अशा निर्वाणाचा मी धिक्कार करतो. जो लाखो लोकाच्या छळास उपेक्षेचे सहाय्य करूनच मिळतो तो निर्वाण नसून नरक होय.

धर्म : (प्रकट होऊन) परंतु हे महाकर्मयोगिन् वीरवरा, तू निर्वाणच्युत झालाच नाहीस. उलट ह्या हौताम्यानेच निर्वाणपदी प्राप्त झालास. कारण,

द्वाविमौ पुरुषौ लोके सूर्यमंडलभेदिनौ ।

परिव्राट् योगयुक्तश्च रणे चाभिमुखे हतः ।।

विक्रम : हे दिव्य पुरुषा तू कोण आहेस? देव की देवदूत?

धर्म : सर्व मानव धर्मांचे अधिष्टान असणारा मी धर्म आहे. हे बुद्धदेव, तुम्ही परिव्राटांत श्रेष्ठ आहात! मानुषकावर तुमचे अनंत उपकार आहेत. हे शाक्य राष्ट्र आणि ही शाक्य जाति आज गतप्राण झाली पण तिचे मुख्य जीवनकार्य पूर्ण करून मग ती लयाला गेली. कारण तिने तथागत बुद्धाला जन्म दिला! आणि म्हणूनच एका अर्थी ती चिरंजीव होणारी आहे. तुझ्या शीतल आणि सरल धर्मोपदेशाने मोहित झालेले देव आणि दानव, यक्ष आणि तक्षक, आर्य आणि अनार्य अखिल मानव द्वीपद्वीपांतराहून तुझ्या ह्या जन्मभूमीचा पुण्यतम भूमि म्हणून शोध करीत करीत आपल्या भक्तिभावाच्या पुष्पांजलि अर्पण करण्यासाठी येथे येतील. ह्या शाक्य जातीचे इतिहास, धर्मपुराणासारखे अभ्यासिले जातील, राजे आणि महाराजे त्यांचे मुकुट आणि साती सागर त्यांचे माणिकमोती तुझ्या मूर्तीवरून ओवाळून टाकतील. कोणाही मनुष्याच्या चरणावर विनत झाली नसतील इतकी कोटि कोटि मानव मस्तके तुझ्या ध्यानस्थ मूर्तीच्या चरणी युगोयुग विनम्र होतील. हे परिव्राट् महाकर्म संन्यासिन् बुद्ध, तू निर्वाण पदाचा अधिकारी आहेसच; परंतु हे वीरवर महाकर्मयोगिन् विक्रम, तूही त्याच निर्वाणपदाचा अधिकारी आहेस! कारण, धर्माचे मुख्य मर्म जे मानुषकांचे अत्यंत हित ते साधण्यासाठी तू सर्वस्व त्याग करून अभिमुख समरात लोककल्याणार्थ झुंजत लोकहिसकांचा वध केलास! स्वतः प्राणत्यागही करण्यास कचरला नाहीस. दुर्दैवाने तुझी स्मृति व्यक्तिरूपाने बुद्धासारखी मागे उरणार नाही. पण लौकिक हा बहुधा योगायोग असतो. योग्यतेचे अनन्य गमक नसतो.आणि तुझ्या कर्मयोगाच्या महत्तेच्या ह्या विस्मृतीचा ह्या तुझ्या शाक्य जातीस जसा भयंकर दंड द्यावा लागला, शस्त्रबळाच्या उपेक्षेने आणि कृषि, कामिनी, कृपाण ह्यांच्या आत्यंतिक संन्यासाच्या अतिरेकामुळे जसे हे दुर्बल शाक्य राष्ट्र प्रबळ दुष्टांच्या हिंसेस बळी पडले त्याचप्रमाणे आणि जवळ जवळ त्याच कारणासाठी हे उभे आर्यावर्तही यवन-हूण-शकांच्या राक्षसी आक्रमणास बळी पडेल. शाक्य राष्ट्राचा हा आजचा विनाश हा असल्या भावी उभ्या आर्यावर्तावर येणाऱ्या घोर संकटाची केवळ पूर्वसूचना आहे. काळाने लहान प्रमाणावर करून

पाहिलेला तो केवळ पूर्वप्रयोग आहे. वीरवर विक्रम, ज्यांत निष्क्रिय संन्यासाचे सर्व ऐहिक आणि पारलौकिक लाभ असूनही जो अत्यधिक लोक हित साधक आहे अशा तू उपदेशिलेल्या आणि आचरलेल्या शुभ कामीं शक्तिपूजक कर्मयोगाचा अवलंब करणे हेच त्या संकटाच्या कचाट्यातून मुक्त होण्याचे साधन आहे. धर्माचे मुख्य स्वरूप आणि उद्दिष्ट जे मानुषकांचे ऐहिक आणि पारलौकिक धारण, उद्धारण ते अशा कर्मयोगानेच अधिक प्रमाणात साधत असल्याने, मानवहो, माझे निश्चित आणि उत्तम मत हेच आहे की-

यद्यपि -- संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ ।।

तथापि -- तयोस्तु कर्मसंन्यासात् कर्मयोगो विशिष्यते ।।

(समाप्त)